॥ श्री ॥

# सम्राटाचा सूड.



[ गद्य पद्यात्मक नाटक. ]




लेखक—

दत्तात्रेय गणेश सारोळकर.

'जनता-जनार्दन', 'अरुण-प्रभा', 'पेशव्यांचा पेशवा'
'गरिबांचा सम्राट', 'हाच तो शास्त्री', 'देहांत प्रायश्चित्त',
'पराक्रमाचा पाया', 'शुभ मंगल', 'दर्या दौलत',
'वीर सौभद्र', 'पुन्हा हिंदु',
इत्यादि संगीत नाटकांचा कर्ता व संपादक 'मौज'.





१९३०





किंमत १२ आणे.

# सुरवाती पूर्वी

' सम्राटाचा सूड , हें काल्पनीक नाटक ह्मणजे खरा सम्राट व तोतया सम्राट यांच्या मधील दोन सिंहासनाचा लढा होय. हे नाटक रंगभूमीवर आण-ण्याच्या कामीं श्री. बाळासाहेब चिवटे मालक मनो-हर स्त्री सं. मंडळी, श्री. बाळासाहेब मुजूमदार, श्री. बाळासाहेब गोखले, श्री. बाबुराव तुळजा-पुरकर, श्री. गोविंदराव केळकर, श्री. भालचंद्रपंत तिखे. श्री. पांडुरंगराव तलगिरी, श्री. गणेशराव श्री. परचुरे या सर्व सज्जन मित्रांनीं आपले पणानें मला कल्पनातींत मदत केलेली आहे तसेंच मनोहर स्त्री संगीत मंडळींतील सर्व लहान थोर नट नटीनीं मला ऋणी करून ठेवले आहे.

शनिवार ता. एकोणतीस माहे मार्च एकोणिशें तीस रोजीं या नाटकाचा प्रथम प्रयोग मनोहर स्त्री. संगीत मंडळीनें पुणें विजयानंद नाटक गृहांत केला.

ग्रंथकर्ता.

# —सम्राटाचा सूड—



## मंगलाचरण

पद युगुली वाहुं सुम स्मरुनी गाऊं माता पुनिता ॥
कथा कलींकाल हरीकाल सुख अनुपम श्रीदध्यात ।
शिवकांता ॥ धृ० ॥
शुभांगी शांकरी विदित दुहिता नच कृपाकांता ॥
भवार्थी तुजला स्ताविन सुनति त्रिपुरांता ॥
पाप हरण सुनम स्करण गुण गण नमिता ॥ १ ॥

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.



( आरण्य—देवीचें देऊळ. )

मृणालिनी०—अगबाई! किती भयाण जागा ही! दिवसा देखील भीतीनं बोवडीच वळायची माणसाची.

१ भिल्ल०—काय स्वरुप आहे!

२ भिल्ल०—इंद्राची इंद्राणीच आहे.

मृणालिनी०—कुणाला बरोबर न घेतां ताईसाहेब आल्या हे कांहीं चांगल केलं नाहीं. महाराजांना भेटायची इतकी काय घाई झाली होती न कळे! माझी तर भीतीनं गाळणच उडली आहे.

३ भिल्ल०-गड्या हो पुढें-बघतोस काय!

मृणालिनी०—कोणी तरी बोललं खास! आतां काय बरं करूं

१ भिल्ल०—माझा हात धर आणि माझ्या बरोबर चल.

२ भिल्ल०—नाहीं-नाहीं-माझ्या बरोबर रहा आणि जिवाची गंमत कर.

३ भिल्ल०—खबरदार त्यांच्या बरोबर गेलीस तर-माझी बायको हो

४ भिल्ल०—छट्! मी ही शिकार हेरली आहे तेव्हां हिच्या० माझा हक आहे-चल ये सुंदरी माझ्या बरोबर चल.

मृणालिनी०—अगबाई! आतां काय करूं!

१ भिल्ल०—उगीच नको मरं-हो माझं पाखरूं!

मृणालिनी०—बाबानो!

२ भिल्ल०—बाबानो!

मृणालिनी०-मी तुमच्या पाया पडतें. मला वांचवा—

३ भिल्ल०—मीच तुझ्या पाया पडतो पण मला—

४ भिल्ल०—याला नाहीं मला—

१ भिल्ल०—बिलकूल नको यांना-हो म्हण या पठ्याला!

मृणालिनी०—मी या देवीच्या दर्शनाला आलें आहे.

२ भिल्ल०—म्हणूनच तर या देवीचं आम्हांला दर्शन घडल. सुंदरी—

१ भिल्ल०—हे देवी—

३ भिल्ल०-कात्यायिनी—

४ भिल्ल०-पुरुष मर्दीनी—

१ भिल्ल०-आम्ही सगळेच तुझ्यावर प्रेम करीत आहोंत.

४ भिल्ल०-कबूल हो नाहींतर-या देवीला तुझा बळी देऊन तुझी सारखी वाटणी करून घेऊं.

मृणालिनी०-ताईसाहेब धांवा हो धांवा-या मेल्यांच्या हांतून तुमच्या दासीचं रक्षण करा. [ सौदामिनी येते ]

सौदामिनी०-बदमाषांनो-दूर व्हा-देवीच्या देवळांत असा अत्याचार करतां काय-

१ भिल्ल०-गड्या ! ही दासी तूं घे आणि हिला मी नेतो.

२ भिल्ल०--वाः ! मी काय गाजरपारखी आहे होय ! मीच हिला पळवतो.

सौदा०-काय रे जाता कीं ! या मायभवानीपुढं तुमचा बळी देऊं ?

३ भिल्ल०-आमचा बळी !

सौदा०-हो हो तुमचा बळी !

२ भिल्ल०-तुमच्या कामाक्ष राजालाही घेतां येणार नाहीं.

१ भिल्ल०-किंवा त्या मूर्ख धनशील अमात्याच्या बापालाही घेतां येणार नाहीं.

४ भिल्ल०-अगर त्या मूर्ख चारुशीलालाही घेतां येणार नाहीं.

सौदा०-पण मला मात्र घेतां येईल. मुकाट्यानें जा नाहींतर या खड्गाला बळी पडाल !

भिल्ल०-उपसारे तरवारी आणि घ्या यांचा बळी !

[ तरवारी उपसतात सौदामिनीची व त्यांची लढाई होते तोंच देवळांतून भिल्ल वेषांत धैर्यशील येतो. ]

**धैर्य०**—सबूर तरवारी म्यान करा—नाईक तुम्हांला माझी शिस्त माहीत नाहीं काय! सज्जा कोणाक्षाचा बळी या आदिमायेला द्यायचा की या बायकांच-बायकांशीं लढण्याकरितां का या तरवारी बाळगतां. तरवारी बाळगून बायकांशीं लढणारे लोक माझ्या बंडाळींत आहेत असं जर त्या माझ्या हाडवैऱ्याला समजलं तर माझं मस्तक त्याला केव्हांच मिळेल. आणि असं झालं म्हणजे मग आपल्या बंडाचा निःपात त्याला एका क्षणांत करतां येईल. माझ्या बंडाळींतल्या कोणत्याहि माणसानं—कोणत्याहि बंडखोरानें स्त्री-गरीब आणि निरपराधी याच्यावर शस्त्र चालवावयाचं नाहीं ही शपथ तुम्हीं कसें विसरलांत! माझी बंडखोरी म्हणजे दरोडेखोरांची लूटमार आहे अशी तुमची समजूत झाली आहे काय? नाईक! तुम्हांला याची जाणीव नसावी आश्चर्य आहे! असे अत्याचार धैर्यशीलाच्या बंडाळींत झालें तर राजा कामाक्ष आणि त्याचा सूड घेणारा त्यांचा हाडवैरी हा धैर्यशील यांत काय अंतर आहे! त्या मांगाच्या बापानें माझ्या बापाचा खून करून माझी गादी घशांत घातली आहे. ती माझी गादी माझें राज्य-माझें रत्नपूर मला त्याच्या घशांतून काढायचं आहे. ही एकच सूडाची भावना माझ्या बंडाळीच्या मुळाशीं आहे. वारवार या खुलाशाचे प्रसंग तुम्हीं आपल्या गैरशिस्तीनं मला आणून द्याल तर मला तुमची व्यवस्था फार निराळ्या तऱ्हेनं करावी लागेल.

**१ भिल्ल०**—महाराज-आम्हा साऱ्यांना क्षमा करा पुन्हां जर आपल्या शिस्तीचं उल्लघन झालं तर आपण आमचा बळी या आदीमायेला बेलाशक द्या.

धैर्य०–मी क्षमा करण्या ऐवजीं हिनं तुह्मांला क्षमा केली पाहिजे.

सौदा०–किती उदार हृदय हें!

मृणालिनी०–धैर्यशील महाराज किती सालस आहेत बाई!

१ भिल्ल०–बाईसाहेब, केल्या अपराधाची क्षमा करा.

सौदा०–आदिमायेची क्षमा मागा म्हणजे झालं!

धैर्य०–नाईक! जवळ पास असा–मी आलोंच [भिल्ल जातात.]

सौदामिनी–येण्यापूर्वीं मला कळवल असतस तर असा प्रसंग कधींही आला नसता.

मृणालिनी०–वडीलधाऱ्यांच्या नकळत आपल्या प्रियकराला भेटायला आलेल्या रमणीवर असे प्रसंग नेहमींच येतात.

सौदा०–मृणाल–गप्प रहा. थट्टेला वेळ काळ कांहीं पहात जा.

मृणाल०–काळ वेळ पाहून थट्टा करण्याचे दिवस माझे आतां राहिले नाहींत–ताईसाहेब–

सौदा०–पुरे कर देवीचं दर्शन घे–

मृणाल०–मी घेते देवीचं दर्शन; पण आपण मात्र ह्या पहाडांतल्या किराताचं दर्शन लौकर आटपा. ( जाते )

सौदा०–पहाडांतला किरात! काय मेली भलतंच बोलते आहे.

धैर्य०–सौदामिनी–तुझी दासी योग्यच बोल बोलली.

सौदा०–अगदींच तिच्या जिभेला हाड नाहीं–कुणाला राग देखील यायचा हिच्या फटकळ बोलण्यानं!

धैर्य०–बिलकूल नाहीं–तुला मनुष्य स्वभावाचं ज्ञान आहेच. फटकळ बोलणारीं माणसं अंतःकरणाची मोठीं सरळ असतात. गोड बोलणारी माणसं जरी गोड वाटत असली तरी ती गोडी स्वार्थी असतं. मनुष्य स्वभावाचं आकलन करणं फार कठीण आहे.

—पद्य—

मानव मन ज्ञात चंचल भारी ॥
समजत नाहीं विकारी ॥ धृ० ॥
दिसे तसे भासत ना जगता मोद मोह नादकारी ॥१॥

सौदा०—मला नसेल बाई इतरांच्या स्वभावाची परीक्षा, पण इकडचा स्वभाव मला चांगलाच माहीत झाला आहे.

धैर्य०—वल्लभाची वधूपरीक्षा एकवेळ चुकेल. पण रमणीची वरपरिक्षा सहसा चुकणार नाहीं.

सौदा०—असं बोलून मला लाजवण होत आहे स्वारीचं समजलें मी!

धैर्य०—न समजायला काय झालें? तूं तशी समजूतदार आहेस, तशी नसतीस तर देवीच्या दर्शनाचं निमित्त करून या पहाडांतल्या किराताला भेटायला कशाला आली असतीस!

सौदा०—पुन्हां नाहीं गडे म्हणायचं असं! पहाडांतला किरात असं म्हणायचं नाहीं—नाहींना म्हणणं होणार!

धैर्य०—मी पहाडांतला किरात—भिल्ल—आहे हें अगदीं खरं आहे. मनुष्य ज्या स्थितींत असतो त्याच स्थितींत तो आहे हें सांगायला त्याचं मन केव्हांही कचरतां कामा नये. मात्र खरी स्थिती त्यानीं लपवून लोकांची केव्हांही दिशाभूल करूं नये. मात्र स्थितीचं दैन्य दाखवून त्यानीं आपला मानीपणा आणि बाणेदार वृत्ती मात्र सोडतां कामा नये.

सौदा०—कांहींही म्हणणं झालं तरी मी कांहीं आपल्याला तसं म्हणूं देणार नाहीं.

**धैर्य०**—मग काय म्हणशील.

**सौदा०**—सांगू कां गडे! नाहींतर राग येईल स्वारीला!

**धैर्य०**—तूं समोर असलीस म्हणजे मला रागच येत नाहीं.

**सौदा०**—कांहीं तरी बोलायचं झालं! राजसा—

**धैर्य०**—राजस विशेषणं माझ्या नांवाला शोभत नाहींत—सौदामिनी—

—पद्य—

**सुखमम मंगल भालीं सदाहि धाम मानीं वनवास निराधार ॥ धृ० ॥ शुभ गणीं परिजन दिनरात या विपिन विहार ॥ १ ॥**

**सौदा०**—महाराज, मला मात्र असं वाटत नाहीं. आपण खरे खुरे राजेच आहांत.

—पद्य—

**नाहीं संदेह तो या मना राजसा राया जिवाचा ॥ निधी या महीचा ॥ धृ० ॥ नुरला मनीं भाव द्वैताद्वतांचा ॥ शोभेल हा तरणीं तारांगणाचा ॥ नाहीं निराधारी प्रेमा सखीचा ॥ १ ॥**

**धैर्य०**—सौदामिनी, मी राजा होतों पण आतां नाहीं. मी एक बंडखोर आहे. माझं राज्य गिळंकृत करणाऱ्या रत्नपूरच्या राजाचा सूड घेणारा एक मामुली माणूस आहे. राज्य गमावलेला मी एक हतभागी राजा आहे.

सौदा०—हतभागी कसें! महाराज आपण हतभागी नाहीं. आपण भाग्यशालीच आहां— ( मृणाल येते )

मृणालिनी०—ताई साहेब—चला लौकर—वेळ झाला तर वृद्ध धनशील राजवाडा डोक्यावर घेतील.

धैर्य०—जा—सौदामिनी—जा. या हतभाग्याकरतां धनशीला सारख्या भाग्यशाल्याची अवकृपा करून घेऊं नकां.

सौदा०—महाराज—या गरीब दासीवर त्यांची अवकृपा झाली तरी चालल, पण आपली मात्र होतां कामां नये.

मृणा०—ही विनंति करण्याकरतांच ताईसाहेब आल्या होत्या. महाराज!

धैर्य०—याचें उत्तर उद्यां देईन—

मृणा०—उद्यां कां? आजच या [illegible]ला द्या-म्हणजे या मंदीरांत वाग्निश्चय करूं.

सौदा०—मृणाल—भारीच बाई तूं उतावीळ.

मृणा०—मी खरंच उतावीळ—यांना भेटायला तातडीनं आलेली तूं मात्र सावचित्त!

धैर्य०—सौदामिनी जा लौकर—वेळ झाला तर माझ्या शिरस्त्या-प्रमाणं या पाहाडांत पुन्हां तुला त्रास होईल.

सौदा०—पण—

धैर्य०—पण काय—

मृणा०—दुसरं काय—पुनर्दर्शन केव्हां घडेल माझ्या धनिणीला?

धैर्य०—उद्यां जातीनें धनशीलांच्या वाड्यांत मी येईन-मृणालीनी, हिला संभाळून ने.

**मृणा०**-होय महाराज-

**सौदा०**–मृणाल, ते इथून गेले कांग!

**मृणा०**--इश्श! तुम्हांला नाहींच कां दिसत? तुमची दृष्टी त्यांनीं नेली कीं काय बरोबर!

**सौदा०**–हो गडे! त्यांनीं जरी माझी दृष्टी नेली नाहीं, तरी माझी दृष्टी त्यांच्याच बरोबर गेली आहे. ते माझ्या नेत्रांतील शक्ती झाले आहेत, माझ्या अंतःकरणांतील ते स्फूर्ती आहेत. मृणाल, ते जरी गेले असले तरी मला इथंच दिसत आहेत. ती पहा–पहा गडे डोळे भरून त्यांची ती भव्य मूर्ती, पहा– त्यांचा तो हांसरा मुखचंद्रमा पहा– किती मोहक आहे तो–द्वितियेचा चंद्र देखील लाजेनं खालीं मान घालील हो–जिवाच्या राजराजेश्वरा, आपल्या दर्शनानं ही हतभागी सौदामिनी आज पुनीत झाली. आपल्या सोज्वळ अरुणोदयानं हिच्या अंतःकरण नभांतलां चिंतेचा काळोख पार गेला. माझी दृष्टी सारखी आपल्याच स्वरुपाकडे लागली आहे. सखे, त्यांच्या पराक्रमामुळं, त्यांच्या शालीनतेमुळं माझं त्यांच्यावर प्रेम बसलें आहे.

**मृणा०**–आतां काय करावं बाई यांना–मुलखावेगळीच तऱ्हा हिची–अलीकडच्या सगळ्याच तरुणी अशा कशा बाई! हे प्रेम कीं वेड!

**सौदा०**–हें वेडच आहे. मृणाल, त्यांनीं मला खरंखुरंच वेड लावलं आहे. ज्या दिवशीं या देवीच्या महोत्सवांत माझी नी त्यांची दृष्टीभेट झाली त्या दिवसापासून मी वेडीच झालें आहे.

मृणाल०—मी मात्र तुमच्या या वेडानं वेडी होण्याच्या पंथाला लागलें आहे.

सौदा०—मृणाल, तुला माझ्या हृदयाची तळमळ कशीग कळणार!

मृणाल०-तुमच्या सारखं मला आतां हृदय कसलं नी काय कमलं!

सौदा०—मृणाल, मी इथंच रांहाते बाई—

मृणाल०—हं—चला लौकर—चला अगोदर— ( हात धरते )

सौदा०—मृणाल—थांबग जरा—ते बघ माझ्यकडेच पाहात आहेत.

—पद्य—

सुजन मधुर हंसतां वाटे धन्यता ॥
मम मनीं मोदविहारी मधुप मधुभारी ॥धृ०॥
गमत जिवा शिवसा भासे नयना ॥
प्रेमळ समया हृदया खरा सुधासदा ॥
नाथ माझा सौख्यकारी ॥ १ ॥

---

## अंक १ ला.

### प्रवेश २ रा.

[ चारुशीलाचें घर—चारुकान्त, शास्त्री व चारुशीला ]

चारुकान्त०—राधेकृष्ण, राधेकृष्ण, राधेकृष्ण -आजचा स्कंध अमदीं छान झाला.

**चारुशीला०**—न व्हायला काय झालं; श्रोता नी वक्ता विषयांत समरस झाला म्हणजे शास्त्रांतलीं प्रमेयं चांगलींच पटतात.

**चारुकान्त०**—आजच्या स्कंधाचं रहस्य समजलंना चांगलं.

**चारुशीला०**—न समजायला काय झालं? तुमची सांगण्याची शैली फारच बाई चांगली आहे. इकडून इतकें शास्त्री ठेवले पण मला आपलें तुम्हीच पसंत आहांत.

**चारुकान्त०**—राधेकृष्ण राधेकृष्ण-माझ्या विषयीं तुमच मत बरं दिसतं आहे.

**चारुशीला०**—मतच कां? तुम्ही देखील बरें दिसतां! नाहींतर आमचं ते ध्यान-अहो हें कां नवरें! जळले मेले नवरे!

**चारुकान्त०**—छे! छे! पत्नीनं पतीविषयीं अशी अनुदार भाषा काढूं नये. पती हें पत्नीचें दैवत आहे. राधेकृष्ण—

**चारुशीला०**—कांहीं तरी बोलतां झालं!

**चारुकान्त०**—कांहीं तरी कसं-अगदीं असं अस्संच शास्त्र आहे. राधेकृष्ण!

**चारुशीला०**—मी म्हणते अगदीं चूक आहे तें शास्त्र!

**चारुकान्त०**—म्हणजे कसं! शास्त्रांत चूक असणार नाहीं. आतां एखाद्या वेळीं शास्त्री चुकीला पात्र होईल. पण शास्त्र अगदीं बरोबर आहे. राधेकृष्ण.

**चारुशीला०**—पत्नी हेंच पतीनं दैवत मानलं पाहिजे. असं शास्त्र असावं-तुम्हांला नाहींका असं शास्त्र तयार करतां येणार!

**चारुकान्त०**—न करायला काय झालं! आहो हीं शास्त्रं माणसांनींच तयार केली आहेत! तीं तेवढीं माणसं आणि आम्हीं

काय माणस नव्हेत हो–आपण सांगाल तसे शास्त्र तयार करून देईन. राधेकृष्ण!

**चारुशीला०**–अगदीं माझ्या मनासारखं?

**चारुकान्त०**–अगदीं आपल्या मनासारखं! आपल्या इच्छे-विरुद्ध वागल्यानें माझी इच्छा कशी पुरी होणार! राधेकृष्ण!

**चारुशीला०**–शास्त्रांत स्त्रियांच्या बद्दल जीं अनुदारपणाचीं सूत्रं आहेत तीं अजिबात काढून टाका.

**चारुकान्त०**–आणि मग—

**चारुशीला०**–नी त्या ऐवजीं पुरुषांच्या अनुदाराचीं सूत्रें घाला–

**चारुकान्त०**–सूत जमणारसं दिसतं–राधेकृष्ण.

**चारुशीला०**–विवाहाचें शास्त्र अगोदर बदला.

**चारुकान्त०**–तें अगोदर बदललंच्च पाहिजे.

**चारुशीला०**–त्याशिवाय माझ्या सारख्या तरुणीं वृद्धांच्या जाचांतून सुटणार नाहींत.

**चारुकान्त०**–त्या शिवाय तरुणांच्या पाशांत सांपडणार नाहींत-राधेकृष्ण–

**चारुशीला०**–अहो काय सांगुं तुम्हांला–

**चारुकान्त०**–जें तुमच्या मानांत असेल तें सांगा मला

**चारुशीला०**–माझं लग्गीन झालं नी माझ्या नशीबीं हें ध्यान आलें! हे का नवरे!

**चारुकान्त०**–छट्! यांना कोण म्हणेल नवरे! वृद्ध तरुण विवाहांत नवरेपण पत्नीकडे येतं!

**चारुशीला०**–असं खरं ना!

**चारुकान्त**०–शास्त्रच सांगत आहे असं–

**चारुशीला**०–बाबानीं पैशाकडे लक्ष देऊन मला याच्या पदरांत लोटली. त्यानां वाटलं कीं मुलगी श्रीमंताला दिली कीं पोरीला सुख लागेल! पण खरं सुख पैशांत आहे कां! तुम्हींच सांगा.

**चारुकान्त**०–पैशांत सुख नाहीं पण सुखांत पैसा आहे. भगवान श्रीकृष्णावर राधेचं प्रेम होतं आणि म्हणूनच तिनं आपला लग्नाचा वल्लभ दृष्टीआंड करून श्रीकृष्णाच्या दृष्टीला दृष्ट भिडविली.

**चारुशीला**०– हो तें मी विसरलेच–आजच्या स्कंधांत हेंच तुम्ही मला सांगितलंत– अगदीच विसर पडला मला.

**चारुकान्त**०– पडायचाच! एकीकडचं लक्ष दुसऱ्याकडे गेलं म्हणजे पहिल्याचा विसर पडायचाच.

**चारुशीला**०–अगदीं असंच वाटतं मला म्हणून म्हणते कीं पैसा हें सुखाचं साधन नसून प्रेम हेंच सुखाचं साधन आहे.

**चारुकान्त**०–प्रेम आहे म्हणूनच जग आहे. शास्त्र आहे– मी आहे आपण आहांत आणि आपलें यजमान चारुशीलही आहेत.

**चारुशीला**०– त्याचं नांव देखील काढूं नका– अहो हे का नवरे–नवरा कसा असावा सांगू कां तुम्हांला–

**चारुकान्त**०–सांगा. म्हणजे शास्त्र्याच्या कानाचं तेवढंच समाधान होईल.

**चारुशीला**०–ऐका हं!

— पद्य —

॥ स्त्री चरणा चुरी जो नेमें पती चांगला ॥
॥ रुसता स्त्री रुसे जो प्रेमें पती चांगला ॥धृ०॥
॥ पाळी वचना आज्ञा करितां सुखवी कांत माला ॥
॥ नित्य पुरवी कांक्षा सखीची वदुनी प्रेम बोला ॥१॥

असा असावा नाहीतर आमचं ध्यान- ( चारुशील येतो. )

**चारुशील०**-मुत्सद्यांच डोकं म्हणजे एक और चीज आहे बुवा! सौदामिनीचं वंडखोरावर प्रेम आहे असं सम्राटानं सांगितलं मात्र तेव्हां ते म्हणाले--आहांत खरें मुत्सद्दी--मी म्हटलं आहेच- अहो, मला ज्या अर्थी डोकं आहे त्या अर्थी मी मुत्सद्दी आहे. या रत्नपुरांत कोणाचं कुणाशीं सूत आहे हें मी पटकन ओळखून चटकन सांगतो-मुत्सद्याला हें जर सांगतां आलें नाहीं तर तो मुत्सद्दी कसला-

**चारुशीला०**-प्रेमाचं पुराण संपलं नी यांचं मुत्सद्दी पुराण सुरू झालं!

**चारुशील०**-चारु, मी तुला सांगत होतो ना-

**चारुशीला०**-(वेडावून) हं: काय सांगत होता मला-

**चारुशील०**-मुत्सद्याची अशी टवाळी करूं नको-

**चारुशीला०**-सगळं रत्नपूर तुमची टवाळी करीत आहे.

**चारुशील०**-रत्नपुरांत मी एकटाच मुत्सद्दी असल्यामुळं त्याला माझा हेवा वाटतो आहे-या मुत्सद्याचा कोणालाही हेवाच वाटेल. काय शास्त्रीबुवा--मी म्हणतो तें खरं कीं नाहीं.

**चारुकान्त**०-यजमानांच वाक्य ह्मणजे शास्त्रीय सिद्धांतच तो-बरोब्बर असायचा! राधेकृष्ण.

**चारुशीला**०-तुमचा आपला प्रत्येक गोष्टीला शास्त्राधार आहेच आपला.

**चारुशील**०-मुत्सद्याला डोक्याचा आणि पंडिताला शास्त्राचा आधार असलाच पाहिजे.

**चारुकान्त**०—बुडत्याला काडीचा आणि तरुणाला तरुणीचा आधार असलाच पाहीजे.

**चारुशीला**०—इकडून आज मुत्सद्दीपणा तरी कोणता झाला?

**चारुशील**०- सम्राटांना साफ सांगितल कीं सौदामिनीचें तुमच्यावर प्रेम नाही- बंडखोरावर तिचं प्रेम आहे तेव्हां तुमचं जमायचें नाहीं.

**चारुकान्त**०—एकावर प्रेम नसलं म्हणजे ते दुसऱ्यावर असलंच पाहिजे, हा प्रेम शास्त्राचा सिद्धांत आहे.

**चारुशील**०—मुत्सद्दी आणि शास्त्री यांची एकवाक्यता झाली.

**चारुकांत**०—विषय एक असला म्हणजे ती व तो यांची ग्रथी जमते व एकवाक्यता होतें. राधेकृष्ण!

**चारुशील**०-बरं खरं आहे. मुत्सद्याला हे कबूल आहें. बरं पण शास्त्रीबुवा, हिला लागलीका भक्तीची गोडी.

**चारुकान्त**०-लागत चालली आहे-

**चारुशलि**०-आज कोणता अध्याय सांगितलांत-

**चारुशीला**०-आजचा अध्याय मला फारच आवडला. बाई-

**चारुशील**०-अस्सं- पण होतं काय त्यांत-

**चारुकान्त**०-कृष्ण विरह होतां!

**चारुशील**०-राधाकृष्णाचं आख्यान ना!

**चारुकान्त**०-राधेकृष्ण.

**चारुशील**०-ठीक. फारच बहारीचं आहे-चारु, नीट ध्यानांत ठेव अं-मुत्सद्याला एखाद्या वेळीं तें न आठवलं तर अडचण पडूं नये. बरं शास्त्रीबुवा, प्रसाद घेऊन या आंत- (जातो.)

**चारुकान्त**०-यजमान फार भोळे आहेत.

**चारुशीला**०-आले आहेत भोळे! माझ्या पुढं कांहीं चालत नाहीं हो त्यांचं-

**चारुकान्त**०-नाहीं चालत म्हणूनच बरं नाहींतर माझं इथे कसं चाललं असत-राधे कृष्ण—

**चारुशीला**०-मग मी सांगितलं तसं कराल ना!

**चारु**०-हो जीव मुठींत धरून करीन.

**चारुशीला**०-मला किनई या वृद्ध ध्यानांचा कंटाळा आला आहे. हें पिकलेलं पान नव्या नवतीला नकोसं झालं आहे. माझं किनई-

**चारुकान्त**०-समजलों-मी आपलं अंतःकरण चांगलें समजलों.

**चारुशीला**०-मग सांगाना कायतें!

**चारुकान्त**०-यजमान वाट पाहात असतील तिकडे.

**चारुशीला**०-पाहुंदे त्यांना वाट!

**चारुकान्त**०-छे! छे! मी त्यांचा आश्रित आहे.! राधेकृष्ण.

**चारुशीला**०-पंडीत! माझ्या हृदयाची तळमळ कशी बरं सांगूं तुम्हांला?

—पद्य—

चारुशीला०—नवतीनार भर ज्वानी भराची कंठीं दीनरैना ।
अशीही ॥
नागवेली नव वृद्ध मुखाला शोभत ना
गुलजार मुळींना ॥
जरतारी ज्वानी मम अशी ॥
किनखापी प्रीत नवकशी ॥
झुरणीस जीव दिन निशी ॥
लागला कसा सजना ॥
चारुकान्त०-तरुण जिवाला जरठ रुचेना ॥
गुलाब शोभत जाई जुईना ॥
राधेकृष्ण , राधेकृष्ण ॥
बोलते शास्त्र रसना ॥ १ ॥

चारुकान्त०—चालला-प्रेमाचा पाठ पचत चालला. राधेकृष्ण! शास्त्री या युद्धांत मुत्सद्यावर मात करणार-राधेकृष्ण! ( जातात )

---

## अंक १ ला.

### प्रवेश ३ रा.

( स्थळ:—धनशीलाचा महाल. )

[ पात्रें:—सौदामिनी व मृणाल, धनशील, कामाक्ष, धैर्यशील.

—पद—

या सुचत नाहीं मना या क्षणा ॥
गमत दासी दीना ॥ धृ० ॥
वीर रूप ध्यान धीरा ॥ हें निमालें कालिया
सुख भालीं ना ॥ १ ॥

**सौदामिनी०**—अखेरीस जो दिवस येऊं नये असं मी ह्मणत होते तो दिवस तर उजाडला. आज माझ्या मनाची स्थिती फारच विचित्र झाली आहे. एकीकडे माझ्या जीवावर प्रेम आणि दुसरीकडे माझ्या पालकाचें माझ्यावर वैषयीक प्रेम! लहानपणीं मी अनाथ झाल्यावर धनशीलानीं माझं लालन पालन केलं, लहानाची मोठी झालें—पित्यानीं अगर ~~मातेनीं केलं~~ नसतं असं त्यानीं माझ्यावर प्रेम केलं पण त्यांचा माझ्याशींच लग्न करण्याचा विचार ऐकून त्यांच्या विषयींचा माझ्या मनांतला आदर कमी झाला आहे. मृणाल! तुला तरी ही गोष्ट पसंत पडते कां!

**मृणाल०**—मोठ्यांच्या पंचायती आम्हां गारीबांना कशाला बाई!

**सौदा०**—यांत गरीब नी श्रीमंत असा प्रश्नच नाहीं.

मृणाल०—नाहीं कसा ! अमात्यानीं हा जो विचार करून लग्नाची तयारी चालविलेली आहे अशी तयारी जर एखाद्या गरीबानीं चालविली असती तर आमच्या या रत्नपुरांत त्याची फटफजिती झाली असती पण—

सौदा०—पण म्हणून थांबतेस कां गडे !

मृणाल०—श्रीमंत अमात्य धनशीलांना कोणी ही बोलणार नाहीं !

सौदा०—खरं बोलायला लाज ती कसली !

मृणाल०—लाज नी लज्जा सर्व गरीबाच्या वाट्याला, श्रीमंतांना त्याचं काहीं ही नाहीं. नीतीचे नियम देखील गरीबांना व श्रीमंतांना निरानिराळे असतात बरं या जगांत !

सौदा०—कांहीं नाहीं ! उगीच असा आपला समज झालेला आहे. नीतीचे नियम गरीब श्रीमंतांना सारखेच आहेत.

मृणाल०—म्हणूनच वाटतं आपले पालक आमात्य आपल्याशीं विवाह करून संसार थाटणार आहेत. प्रेमानं वाढविलेल्या मित्राच्या पोरीशीं पिता शोभणाऱ्या वृद्धानें लग्नाचा विचार करणं याला नीति म्हणत नाहींत !

धनशील—( प्र. क. ) अहाहा ! हें मुसमुसलेलं तारुण्य पाहून मला तारुण्याचा हेवा वाटतो आहे, आणि पुन्हां एकदां तरुण व्हावं असा विचार माझ्या मनांत उद्भवतो. रोज उदयाचलावर येणाऱ्या उषेच्या कोमल किरणांपासून तो दोन प्रहरच्या सूर्य किरणापर्यंतचा काल जितका माझ्या दृष्टीचें समाधान करतो तितकं समाधान माध्यान्हीं पासून मावळती पर्यंतचा काळ करीत नाहीं. सौदामिनी—( मृणाल जाते )

सौदा०—कोण आमात्य! काय आज्ञा आहे?

धन०—आतां मी आज्ञा कशी करणार!

सौदा०—ह्मणजे काय!

धन०—छे! छे! आज पासून माझा व तुझा संबंध निराळा होणार! आतां पर्यंत मी तुझा पालक होतो पण आज पासून मी तुझा वल्लभ होणार! तुझ्या प्रेमळ सहवासांत माझं उर्वरीत आयुष्य सुखानं जाणार! सौदामिनी, ज्यावेळीं माझ्या मित्रांनीं मरतेसमयीं तुला माझ्या स्वाधीन केलं त्यावेळीं माझ्या मनांत कोणत्याही प्रकारची सांसारीक कल्पना नव्हती. पण—

सौदा०—मरतेसमयीं माझ्या बाबांनीं आपल्याला दिलेलं वचन—

धन०—त्या वचनाची मला अद्याप स्मृति आहे. वयानं मी वृद्ध झालों असलों तरी बुद्धीनं तरुण आहे. तुझ्या पित्याचं वचन अद्याप माझ्या हृदयपटलावर कोरून ठेवलेलं आहे. मुलगी सज्ञान झाल्यावर तिला चांगत्या कुलाची कुलप्रतिष्ठा करा हे शशीशीलाचें शद्ब मी कसें बरं विसरेन! आणि म्हणूनच—

सौदा०— मी आपल्या चरणीं एक कळकळीची विनंति करणार आहें.

धन०—माझ्या कळकळीच्या विनंतीचा कांहींच कां विचार केला नाहींस! सौदामिनी, माझी दृष्टि तुझ्या सौंदर्यानं बेहोष झाली आहे. यापुढं जगांतील कोणतीही मोहिनी या धनशीलाला मोहविलसीत करायला असमर्थ आहे. पण तुझ्या सौंदर्याचा फुलता बगीचा आणि नेत्रांतील जादूची कारंजी मला मोहित करीत आहेत.

सौदा०—पण महाराज आपलं वय—

धन०—वय आणि प्रेम यांचा संबंध शहाण्यानं जोडूं नये. प्रेमाला वयाचंच काय पण जातीची देखील मर्यादा असतां कामां नये.

सौदा०- प्रेम आणि पावित्र्य यांचा हा सूत्रच्छेद होय.

धन०—मला प्रेमाच्या नाजुक सिद्धांतांत शिरायचं नाहीं. राहीलेलं आयुष्य तुझ्या सारख्या कुलप्रतिष्ठेबरोबर घालविण्याचा मी निर्धार केला आहे. ही गोष्ट मी तुला लौकर कळविणार नव्हतो. पण परवांचा तुझ्या महालांतला परपुरुषांचा प्रकार पाहिल्यामुळं मला ही गोष्ट त्वरीत करावी लागली. जा! लग्नाचा पोषाख करून तयार हो—हो आणि असं पहा, आपल्या जवाहीरखान्यांतून मुद्दाम निवडून मनपसंत केलेले अलंकार अंगावर घाल. मृणाल—अग मृणाल! हिला अलंकारवस्त्रांनीं नटवून आण—जा, सौदामिनी लौकर जा—मंगलाष्टकाचा मंगल मुहूर्त अगदीं जवळ आला.

सौदा०—माझी विनंति नाहीं कां मान्य करणार महाराज!

पद्य

करि पदाला ही विनति बरीना ॥
मती कोती संप्रती वृथा माना ॥ ध्रु०॥
शोभते ही दीन दुहिता ॥ जनकातें नव ॥
कां वदतां वच सुनती ना जाणा ॥ १ ॥

धन०—या विनंतीचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं.

सौदा०- हा विषम विवाह नाहीं कां होत?

धनशीलः–होत असेल? विषम विवाहाच्या भीतीनं माझं मन मुळींच बदलणार नाहीं. सौदामिनी, माझा निर्धार म्हणजे प्रभू रामचंद्राचा बाण आहे.

सौदाः–नाहींना माझी दया येत! महाराज, आपल्या पोरीवर असा प्रसंग आला असता तर?

सेवक–( प्र. क. ) महाराज, बाहेर कोणी संन्यासी आला असून आश्रय मागतो आहे.

धन०–ठीक आहे. त्याला पठवून दे. सौदामिनी, जा विवाहाचे पोषाख कर–मृणाल, लग्नाची सिद्धता करायला पंडिताना कळीव.

सौदा०–शेवटचे शस्त्र उपसून हें लग्न टाळलेचं पाहिजे.

[मृणालसह सौदामिनी जाते संन्याशी वेषांत धैर्यशील येतो.]

धन०–यती महाराजांचें स्वागत असो.

धैर्य०–सच्चिदानंद आपलं मंगल करो–

धन०–काय इच्छा आहे? कोणत्या तिर्थाकडे जायचं आहे.

धैर्य०–तीर्थयात्रा करण्याचा प्रसंग त्या बंडखोरानीं आम्हा साधूसंन्यासावर आणला आहे. त्याचं आणि येथल्या राजांच हाडवैर असल्यानं त्यांनीं असपास बराच धुमाकूळ मांडून आम्हा सारख्यांना त्राही भगवान् करून सोडलं आहे.

धन०–कोण बंडखोर!

धैर्य०– त्यांच नांव वगैरे आम्हांला माहित नाहीं.

धन०–आलं ध्यानांत. तो सह्याद्रींच्या पहाडांतला किरात अहो पण त्याचा खून झाला असं मी ऐकलं आहे.

धैर्य०–त्याचा खून. अहो येथल्या सम्राटांना देखील त्याचा खून करतां येणार नाहीं. त्याला पाहतांच त्यांची गाळण उडेल.

परवां परवां तो या रत्नपुरांत येऊन गेला. आणि आपण त्याच्या खुनाची वार्ता ऐकली म्हणतां?

धन०—म्हणजे तो जिवंत आहे म्हणतां!

धैर्य०—जिवंत काय पण तो येथें देखील यायचा.

धन०—येऊंदे. त्या बंडखोराला अमात्यकुळाचें पाणी दाखवून त्याला यमसदनाला पाठवतो.

धैर्य०—(स्व.) थेरड्याची वल्गना चालली आहे. [पडद्यांत] ऐकाहो ऐका! सम्राट कामाक्ष यांचा सर्व प्रजाजनांना असा संदेश आहे की कोणी एक बंडखोर रत्नपूरच्या आसपास हिंडत असून त्याच्या बंडाळीपासून प्रजा त्रस्त झालेली आहे; तरी त्याला जो कोणी पकडून दरबारांत हजर करील अगर त्याचें मस्तक आणून देईल त्याला दहाहजार दीनार बक्षीस देण्यांत येऊन त्याचा जाहीर सन्मान करण्यांत येईल.]

धैर्य०—महाराज, तर मग हें दहाहजार दिनारांचें बक्षीस आपण पटकाविणार तर—

धन०—थांबा. तो विषय राहूंद्या. तुम्ही अगदी वेळेवर आलांत. अगोदर आमचा विवाह उरकून घेतो आणी मग त्या बंडखोराचे तल्वारीशीं लग्न लावतो.

[विवाहाच्या वेषांत सौदामिनी येते—धैर्यशील संतापतो.] हं ठीक सगळे अलंकार नाहीं कां घातले-मृणाल!

मृणाल०—ताईसाहेब म्हणाल्या मला नकोत ते!

धन०—बरोबर आहे. नाजुक शरीराला त्या दागीन्यांचें ओझं सहन होणार नाहीं. यती महाराज, ही आमची भावी वधू बरं कां! आपला हिला आशीर्वाद असावा. सौदामिनी—

संशय उत्पन्न व्हावा आश्चर्य आहे. सम्राटांनींच काय पण एखाद्या देवडीवाल्यानींही असा संशय घेतला तर तो धनशीलाच्या कुलाचा भयंकर अपमान आहे.

कामाक्ष०—हें आह्मी जाणतों आहों. तुमच्या कुलाची प्रतिष्ठा सर्व प्रजेला विदीत आहे. परंतु पूर्वींचा कुललौकिक जमेला धरून विद्यमान कुलदीपकावर विश्वास ठेवणं चांगलं नाहीं.

धनशील०—उण्या अधिक बोलाचा सम्राटानीं राग मानूं नये. निष्कारण संशयानीं असूयेचा अग्नी भडकवूं नये.

कामाक्ष०—तुमच्या कारस्थानाचा सुगावा आह्मांला पूर्णपणें लागला आहे.

धनशील०—सम्राट्—स्पष्टच विचारतो! कोणतं कारस्थान!

कामाक्ष०—बंडखोरांच—

धनशील० बंडखोरांच!

कामाक्ष०—हो हो! बंडखोरांच. पुन्हां पुन्हां काय विचारतां!

धनशील०—कोणता बंडखोर!

कामाक्ष०—धैर्यशील, आमच्या परमपूज्य पित्यांनीं ज्याला हद्दपार केला तो बंडखोर.

धनशील०—छे! छे! सम्राट्, धैर्यशील महाराज बंडखोर नाहींत. आज दुर्दैवानं त्यांच्या नशीबीं वनवास आला असला तरी आपल्या तोंडून त्यांना बंडखोर असं विशेषण निघूं नये.

कामाक्ष०—बस्स खात्री झाली आमच्या दिलाची!

धनशील०— ती कशाबद्दल!

कामाक्ष०—तुह्मी त्या बंडखोराला फितुर आहांत.

धनशील०-हे शब्द उच्चारणारा राजा नसता तर त्याची गर्दन या या कुलपुरुषांच्या चरणीं वाहिली असती. आणि धनशीलाच्या नेक जात कुलाला निमकहराम व फितूर म्हटल्याबद्दल काय परिणाम होतो हें अखील रत्नपुराला पटवून दिलं असतं. पण आपण सम्राट पडलात म्हणून गय केली.

कामाक्ष०-म्हातारपणाकडे पाहून आम्ही आज पर्यंत तुमची गय केली आहे.

धन०-तसं करण्याचं बिलकूल कारण नाहीं! सम्राट! मला आपण फितूर म्हणून माझी मानहानी केली आहे.

कामाक्ष०-फितुर माणसाची नेहमींच मानहानी होते.

धन०-ही गोष्ट सिद्ध करून द्या.

कामाक्ष०-साक्षी पुराव्यांची कांहींच जरुरी नाहीं. तुमच्या तोंडून ती गोष्ट सिद्ध झाली आहे. मघाशीं तुम्हीं बंडखोराची तरफदारी केलींत त्यावरून आणखी ती साक्षी पुराव्याची काय आवश्यकता राहिली!

धनशील०-चक्रवर्तीच्या मूळ घराण्यांतील राजपुरुषाला बंडखोर म्हणूं नये असं माझं मत आहे. त्यांत तरफदारी कसली!

कामाक्ष०- ही गोष्ट जरी बाजूला टाकली-जमेंत धरली नाहीं तरी आपल्या फितुरीचा आणखी एक पुरावा आमच्या जवळ आहे.

धनशील०-तो कोणता!

कामाक्ष०-आपल्या वाक्यांतील जवाहीर- ती सौदामीनी आपण त्याला अर्पण करणार आहांत.

धनशील०—(स्वगत) याचं मूळ प्रेमाच्या असू येत आहे काय!

कामाक्ष०—आमात्य, आह्मी ह्मणतो ती गोष्ट खरी कीं खोटी!

धनशील०—त्या गोष्टीचा अद्याप मी विचारही केलेला नाहीं. सौदामिनी कोणाला अर्पण करावयाची हा प्रश्न ती सज्ञान असल्यामुळे माझ्या मर्जीवर राहिलेला नाहीं. तिची ती मुखत्यार आहे.

कामाक्ष०—आमचं तिच्यावर नितांत प्रेम आहे. अमात्य तुमची सौदामिनी आह्मी आमची सम्राज्ञी करणार आहांत.

धनशील०—हा प्रश्न तिचा तिनंच सोडविला पाहिजे.

कामाक्ष०—नाहीं! अमात्य, हा प्रश्न आपण सोडवला पाहीजे. ती नाकबूल गेली तरी देखील तिला आपण आमची सम्राज्ञी केली पाहीजे.

धनशील०—ही गोष्ट प्राणांतीही होणार नाहीं.

कामाक्ष०—तीं कां!

धन०—अमात्यांच पदें राजाला राण्या पूरवून त्याचा जनानखाना वाढविण्या करतां राजमंडळानें निर्माण केलेलं नाहीं.

कामाक्ष०—जास्त बोलून आमचा अपमान करूं नका.

धन०—आपणही आमच्या कुळाची हानी होईल अशी आज्ञा करू. नका.

कामाक्ष०—अमात्य ही गोष्ट झालीच पाहिजे—तुह्मी राजनिष्ठ आहांत राजाची प्रत्येक आज्ञा प्रत्येक राजनिष्ठानी मानली पाहिजे.

धन०—राजाची भलतीच आज्ञा मान्य करून राजनिष्ठा प्रदर्शीत करण्यापेक्षां त्या आज्ञेचा भंग करून राजद्रोही ठरलेले काय वाईट! असल्या प्रकारची राजनिष्ठा चारुशीलाच्या कुलाची—धनशीलाच्या कुलाची नाहीं.

कामाक्ष०- तुमची व्यवस्था फार निराळ्या रीतिनं करावी लागेल.

धन०-काय वाटेल ते करा. त्याची मला पर्वा नाहीं. पण लक्षांत ठेवा कीं राज्यपदाला नामुष्की आणणारी गोष्ट झाली तर तिच्या परिमार्जनार्थ मलाही उपाय योजावा लागेल.

कामाक्ष०-थेरड्याची गय करतां कामा नये. अमात्य सौदामिनी आमची सम्राज्ञी झाली नाहीं तर तुमच्या घरादारावरून नांगर फिरवून तुमचं अमात्य पद काढून घेण्यांत येईल. (जातो)

धनशील०-(सम्राट गेल्यावर) घरादारावरून नांगर- कामांध राजा! या धनशीलाचं घर ह्मणजे एखाद्यां गरीबाची झोपडी आहे असं तुला वाटतं काय! अमात्य पद ह्मणजे भीक मागून मिळविलेल्या शिळ्या भाकरीचा तुकडा नाहीं. अगर कोणत्याही सम्राटांनीं मेहेरनजर करून अर्पण केलेली चीज नाहीं. मनगटाच्या मर्दुमकीवर मिळविलेली मालमत्ता आहे! फितूर ह्मणून माझा अपमान करणाऱ्या राजा! आजपासून तुझ्या विषयीचा माझ्या मनांत असलेला आदर नष्ट झाला आहे. आणि या अपमानाचा पुरापुरा सूड घ्यायला मी उद्युक्त झालो आहे. 'सम्राटाचा सूड' हे माझे कर्तव्य ठरलं आहे. धैर्यशीलाच्या घराण्यांचा सत्यानाश केल्याचा आणि माझ्या अपमानाचा पुरापुरा मोबदला हा धनशील घेतल्या शिवाय राहाणार नाहीं! सूड! सम्राटचा सूड हीच माझी प्रतिज्ञा.

[ जातो ]

---

## अंक १ ला.

### प्रवेश ४ था.

[पात्रें—चारुशीला चारुकांत आणि चारुशील.]

[ स्थळ:—चारुशीलाचें घर ]

—पद्य—

चारुशीला०—

**अधीर भारी बाई झालें दिसेना माझा प्यार दिलदार ॥धृ०॥ वृद्ध पतीची रमणी बाला जाळी अशी जीव ज्याला सुरत नवनार सुमहार ॥१॥ कोमल कलिका वृक्ष न ताजा नाहीं मुळीं सुख भाला सुरत सुखसार भव आशा ॥ २ ॥**

वाट पाहून दमून गेले बाई! स्वारी घरीं येण्याची वेळ देखील झाली. तरी अजून येणं झालं नाहीं. खरंच पुरुषांची जातच निष्ठुर! बायका वेडया म्हणून त्यांची मन धरणी करतात, अजून देखील पत्ता नाहीं. जाऊन भेटेन म्हटलं तर आमचं सोंग घर डोक्यावर घेईल. दोन्हीकडून पंचाईत, बाबांची निवड माझ्या प्रेमाची पावलोपावली कुचंबणा करतें आहे. पैसेवाला जांवई मिळाला म्हणजे पोरीला सुख लागेल असं त्यांचं म्हणणं! पण पैसा हें कांहीं खरं सुख नाहीं. प्रेम हेंच खरंखुरं सुख आहे. तरुण मनाच्या भावना जीर्ण मनाला कशा बाई पटाव्या. इकडच्या नशिबांनीं बांधलें गेलें नसतें तर आज चारुकांतासारख्या गुलहौशी तरुणाबरोबर माझा संसार सुखानें

थाटला असता! पण आतां काय! म्हाताऱ्याच्या पदरीं पडून जिवाला नसता रोग लावून घेतला. पण अजून तरी काय झालं आहे! मी लग्नानं या ध्यानाची पत्नी झालें असलें तरी मनानं अगदीं स्वतंत्र आहे.

**चारुकान्त०**-स्त्री स्वातंत्र्याचा विजय असो. मनानं सदैव स्वतंत्र राहणाऱ्या स्वातंत्र्य लक्ष्मीचा जयजयकार असो. राधेकृष्ण. स्त्रिया स्वतंत्रच असल्या पाहिजेत असं शास्त्रवचन आहे.

**चारुशीला०**-पुरें करा तें शास्त्र! या शास्त्राच्या नादांत तुम्हीं घरादाराला देखील विसरलांत.

**चारुकान्त०**-घरादाराला विसरणं हेंच खऱ्या नादाचं लक्षण आहे. नादाची परमावधी ह्मणजे आपपर भावाची समाधी. असं नादशास्त्राचं वचन आहे. राधेकृष्ण.

**चारुशीला०**-शास्त्राच्या वचनांत तुह्मांला तुमच्या वचनाची आठवण राहिली नाहीं वाटतं!

**चारुकान्त०**-वचनं देतांना मनुष्य जितका उदार असतो तितका तीं पाळण्यांत जर उदार असतां तर काय बहार झाली असती! पण शास्त्राज्ञेप्रमाणं चालणाऱ्या माणसांनीं वचनांत दरीद्रीपणा दाखवूं नये असं शास्त्रवचन आहे. वचने किं दरिद्रता.

**चारुशीला०**-तुह्मीं मला भेटीचं वचन दिलं होतं ना!

**चारुकान्त०**-ह्मणूनच चोरट्या पावलानं भेटीला आलों ना!

**चारुशीला०**-चोरट्या पावलानं कां!

**चारुकान्त०**-अशा ठिकाणीं राजरोस येऊं नये असं यव्या-जाण्याचं शास्त्र आहे. राधेकृष्ण.

**चारुशील०**–( स्वगत ) अरे चोरा—

**चारुशीला०**–पण गडे असं चोरा सारखं किती दिवस चालेल !

**चारुकान्त०**–कांहीं दिवस तरी असंच चालवंल पाहिजे.

**चारुशीला०**–मला किनई या घराचा अगदीं कंटाळा आला आहे.

**चारुशील०**–( स्वगत ) ह्मणूनच दुसरा घरोबा करण्याचा विचार चालविला आहेस वाटतं-पण ध्यानांत ठेव मी मुत्सद्दी आहे.

**चारुशीला०**–कधी बरं होईल मना सारखं.

**चारुकान्त०**–दोन मनं सारखी झालीं कीं मनासारखं होतं असं शास्त्र वचन आहे.

**चारुशीला०**–मला या लग्नाचा पश्चाताप झाला आहे.

**चारुशील०**–(स्व.) मला देखील संतापानें ताप भरू लागला आहे.

**चारुकान्त०**–विषम विवाहांत पश्चाताप करावा 'लागतो असं शास्त्र वचन आहे.

**चारुशील०**–(स्वगत) नवऱ्याच्या पश्चात येणाऱ्या सोकाजीला लाथेचा प्रसाद मिळत असतो असं मुत्सद्दी प्रवचन आहे.

**चारुकान्त०**–चारुशील घरांत नाहींत वाटतं !

**चारुशीला०**–गेले आहेत दुसऱ्याची दारें पुजायला.

**चारुकान्त०**–ह्मणूनच शांतपणा वाटतो मनाला तो मुत्सद्दी येथे असतां तर मन मोकळ करून बोलायची चोरी झाली असती या शास्त्याला.

चारुशील०—(स्व.) शास्त्र्याला घरांत ठेवला म्हणूनच झाला सारा घोटाळा. ठीक आहे मी मुत्सद्दी आहे हें चांगलंच पटवून दिलं पाहिजे याला.

चारुशीला०—खरंच बाई मला या संसाराचा वीट आला आहे. जिच्या नशीबीं मनासारखा नवरा नसेल ती खरंच हतभागी.

चारुकान्त०—अगदीं खरं आहे. पण असल्या गोष्टींची वाच्यता न करणं बरं! युक्ती युक्तीनच सर्व गोष्टी केल्या पाहिजेत राधेकृष्णा.

चारुशीला०—वारंवार भेटीला आल्याशिवाय विचार विनिमय तरी कसा होईल!

चारुकान्त०—आपल्याविषयीं चारुशीलांना संशय येऊं देतां कामा नये.

चारुशील०—(उघड) संशय कसला पक्की खात्री झाली आहे माझी.

चारुशीला०—भलतंच काय बोलायचं तें!

चारुशील०—हें भलतंच-हें भलतंच-अं-हें भलतं अं!

चारुकान्त०—तुमचा कांहीं तरी गैरसमज झालेला दिसतो.

चारुशील०—गैरसमज! मुत्सद्याचा गैरसमज केव्हांही होत नाहीं; चारुकान्त, मी तुला शास्त्री म्हणून जरी ठेवलं असलं तरी असले थेर मला आवडणार नाहींत—

चारुशीला०—थेर कसले यांत—

चारुशील०—मग काय चाललं होतं घरांत!

चारुशीला०—घरच्याच गोष्टी बोलत होतों.

चारुशील०—म्हणजे घर करण्याच्या!

चारुकान्त०–हो अगदीं खरं! राधेकृष्ण.

चारुशील०–अरे पण तुमच्या या घरच्या गोष्टीन माझ्या काळजाला घरें पाडलींना!

चारुशीला०–भारीच गडे संशयीं स्वभाव.

चारुकान्त०–निष्कारण संशय आहे तुमचा–पंडितावर विश्वास ठेवा!

चारुशील०–भलत्या बाबतींतला विश्वास मुत्सद्याला कबूल नाहीं. जो प्रेमाच्या बाबतींत विश्वास ठेवतो तो मुत्सद्दी नव्हे. चारु–तुला बजावून ठेवतो कीं पुन्हां जर माझ्या अपरोक्ष ह्याला भेटलीस तर खबरदार!

चारुशीला०–इतकी कां माझ्यावर करडी नजर!

चारुशील०–करड्या केसाची इज्जत राखण्याकरतां मला तुझ्यावर करडी नजर ठेवलीच पाहिजे. मी तसं केलं नाहीं तर मुत्सद्दी कसला! चारुकान्त माझ्या गैरहजेरींत तूं जर येथें दिसलास तर मला तुझं पिंडप्रदान करावं लागेल.

चारुकान्त०–नात्याशिवाय दुसऱ्याला पिंडप्रदान करतां येत नाहीं असं शास्त्रीय वचन आहे.

चारुशील०–जास्त वटवट नको—जा—एकदम निघुन जा.

चारुकान्त०–विचारानं पाऊल टाकावं असं शास्त्र वचन असल्यामुळें मला एकदम निघून जातां येत नाहीं. राधेकृष्ण—

चारुशीला०–सावकास जाहो तुम्हीं!

चारुशील०–हो–म्हणजे हिच्या डोळ्याचं तितकंच पारणं फिटेल.

चारुकान्त०—राधेकृष्ण—

चारुशील०—चल चालता हो—( चारुकान्त जातो )

चारुशील०—थांब—चाललीस कुठं!

चारुशीला०—कुठं म्हणजे वाटेल तिथं.

चारुशील०—वाटेल तिथं! काय बेशरम बायको आहेस ग!

चारुशीला०—मी तुमची पत्नी असले तरी भलतं ऐकून घेणार नाहीं हो! सांगून ठेवतें!

चारुशील०—दम—या मुत्सद्याला दम—कांहीं हरकत नाही-बायकोच्या बाबतींत माझी परिस्थिती नाजूक असल्यामुळं असली मानखंडना सहन केलीच पाहिजे—चारु—

चारुशीला०—बोलूं नका माझ्याशीं.

चारु०—चारु, या मुत्सद्याला असं झिडकारुं नको—

चारुशीला०—एकदां सांगितलंना पुन्हां पुन्हां काय विचारतां!

चारु०—चारुगात्री—

—पद्य—

चारुशीला०—नच बोला कधींही मुळीं सखिला ॥ जवळीना
चला दूर व्हा ॥ धृ० ॥
चारुशील०—देई थारा चरणीं याला ॥ लोटूं नको चारुशीला ॥
चारुशीला०—वृद्ध पतिला मान कसला ॥
चारुशील०—बोलूं नको कटु बोला ॥ जवळीना चला दूर
व्हा ॥ १ ॥

## अंक १ ला.

### प्रवेश ५ वा.

[ स्थळः—राजा कामाक्षाचें निकेतन. नृत्य चालूं आहे. ]

कामाक्ष०—( रागानें ) बंद करा हें नृत्यगायन–चला चालत्या व्हा एकदम; सूडाच्या भावनेनं भणाणून गेलेलं माझं मस्तक अशा नृत्य गायनांनीं शांत होणार नाहीं. सौदामिनीच्या नखरेल नजरेनं बेहोष झालेलं माझं अंतःकरण या मधुर आलापांनीं संतुष्ट होणार नाहीं. बंडखोराचं मस्तक त्याच्या शरीरापासून वेगळं करीपर्यंत आमच्या महालांत गान नृत्याला बंदी करण्यांत आली आहे. आमचं बंदीचं फर्मान चारुशीलाला कळवून आम रियासतीला फर्मावा–चला–चालत्या व्हा. अजून तिथंच उभ्या–चारुशील–

चारुशील०–(प्र. क.) सरकारच्या सेवेला बंदा तयार आहे–कायग अशा उभ्या कां–सरकारचं मनरंजन नाहीं का करायचं–

कामाक्ष०—चारुशील–असल्या रडगाण्यानं माझं मनोरंजन होणार नाहीं.

चारुशील०—मग सरकार ज्या गाण्यानं आपलं मनरंजन होईल असं गाणं या गायिका म्हणतील–कायग येत ना तुम्हांला तसं गाणं!

१ नर्तकी०—हो न यायला काय झालं! आम्हीं गायिकाच आहोंत–

२ नर्तकी०—नुसत्या गायिकाच कां नर्तकी देखील आहोंत–

चारुशील०—वाहवा! असा दोन गुणांचा मिलाफ क्वचितच आढळतो. आपल्याला देखील अशा गुणाची स्त्री पाहिलीच पाहिजे.

कामाक्ष०—किती अरसिक आहेस तूं!

चारुशील०—हुजूर मी मुत्सद्दी आहे. इतरेजनांच्या रसिकते-पेक्षां माझी रसिकता और आहे. ज्याची रसिकता और तो मुत्सद्दी—

कामाक्ष०—तुझ्या रसिकतेची मौज तरी सांग—

चारुशील०—मला जीर्ण वस्तूंचं संशोधन फार आवडतं! संगीतांत आनंद भैरवी आवडते; नवग्रहांतल्या शुक्र ग्रहावर मी एकदम फिदा होतो. संसारांत वसुधैव कुटुंब पद्धती मला पहिल्यापासून आवडते- लग्नांत स्नेह लग्नाचा मी चाहता आहे. काव्य शास्त्रांत वर्हीलापिका आणि रुदन शास्त्रांत मारवाडी पद्धत मला अंतः-करणापासून आवडते—

कामाक्ष०—तुला रसिक-रसिकच काय पण अरसिक देखील अंतःकरण नाहीं.

चारुशील०—म्हणूनच मी मुत्सद्दी आहे—ज्याला अंतःकरण हा काय पदार्थ आहे हें माहीत नसतं तोच प्राणी मुत्सद्दी व्हायला लायक असतो.

कामाक्ष०—कांहीं तरी बोलतो आहेस झालं—

चारुशील०—कांहीं तरी कसं! आपले वडील चक्रवर्ती यांना अंतःकरण नव्हतं म्हणूनचना त्यांनीं धैर्यशीलांच्या वडलांचा खून करून रत्नपूरची गादी बळकावली. ज्याला अंतःकरण नाहीं तोच सम्राट होऊं शकतो—मुत्सद्दी होऊं आणि पुरुषोत्तम होऊं शकतो.

कामाक्ष०—तुझ्या या विचार सरणीवरून तुला शहाणा सम-जावं कीं मूर्ख म्हणावं हेंच समजत नाहीं.

**चारुशील०**—हें कठोर कोडं मुत्सद्दी बुद्धीशिवाय सुटणार नाहीं. आचरणावरून व विचारसरणीवरून मूर्ख ठरणारा आणि जगाच्या बाजारांत शहाणा म्हणून मिरवणारा तोच खरा मुत्सद्दी. सरकार मूर्खपणा आणि शहाणपणा मुत्सद्याशिवाय अन्यत्र संभवत नाहीं—खोटं असेल तर या नर्तकींना विचारा—

**कामाक्ष०**—अग-अजून तुम्हीं इथंच. चला चालत्या व्हा-चारुशील, आतांच्या आंता असं फर्मान जारी करा कीं कोणत्याही इसमानं आमच्या रियासतींत करमणुकीचे प्रकार करायचे नाहींत.

**चारुशील०**—करमणुकी शिवाय दमल्या भागल्या जीवाचं चालणार नाहीं. आपण करमणुकीला बंदी केलीत तर कसं बरं चालेल. शिवाय आपण असं फर्मान जाहीर केलंत तर सार्वजनिक करणूमक बंद होऊन खाजगी करमणूक चालणारच.

**कामाक्ष०**—तें कांहीं नाहीं. सौदामिनी हस्तगत होईपर्यंत करणुमकीला बंदीच झाली पाहिजे.

**चारुशील०**—ठीक हा विचार ठीक आहे. सौदामिनीशिवाय आपल मन उदास झालं आहे—प्रत्यक्ष राजा जेथें उदास तेथं प्रजाही उदासच राहिली पाहिजे. यथा राजा तथा प्रजा या न्यायानं ही गोष्ट बरोबर आहे; केला सरकार आजपासून या फिती-जाद मुत्सद्यानें निश्चय केला.

**कामाक्ष०**—तो कोणता!

**चारुशील०**—आपल्याला सौदामिनी मिळेपर्यंत मुतकी चेहे-यानं रत्नपुरांत राहावयाचं—बायकोनं आनंददायक बातमी सांगि-

नली तरी आनंद मानायचा नाहीं किंवा कोणाच्या शुभमंगलाला गेलों तरी मंगलाष्टकं म्हणायचीं नाहींत.

**कामाक्ष०**—ती कर्मकटकट राहूं दे. सौदामिनीच्या बाबतींत पुढं कसं काय करायचं!

**चारुशील०**-आपण सांगाल तसं करीन—

**कामाक्ष०**-तुझ्या मुत्सद्दी बुद्धीचं शहाणपण तरी कळूं दे!

**चारु०**—असल्या बाबतींत मुत्सद्याचं शहाणपण फार चालतं-ज्याला स्त्रीप्राप्तीचे विविधमार्ग माहीत नसतात तो मुत्सद्दीच नव्हे—मला हे सर्व मार्ग माहीत आहेत—

**कामाक्ष०**-आणि म्हणूनच—

**चारु०**—मी मुत्सद्दी आहे.

**कामाक्ष०**—सौदामिनी जर तुझ्या मुत्सद्देगिरीवर हस्तगत झाली तर तूं खरा मुत्सद्दी.

**चारु०**—सरकार तशा प्रकारचा मुत्सद्दीपणा आमच्या मध्यस्थाच्या पांचवीलाच पुजलेला आहे हा आमचा अनुवंशीक संस्कार आहे. आमच्या आजोबांनीं कित्येक कुमारिकांना मंगलसूत्रें बांधलीं याचा हिशोबच नाहीं. वडलांचा लौकिक फारच—कायमच्या रहिवाशापासून तो त्रिलोक भ्रमण करणाऱ्या प्रवाशापर्यंत त्यांनीं लग्नाच्या सांखळींत सगळ्यांना अडकविलं!

**कामाक्ष०**—तुझ्या पूर्वजांची बढाई मला नको! तूं काय मुत्सद्दीपणा करणार तें बोल!

**चारु०**—स्त्री प्राप्त करण्याचे जे अनेक मार्ग आहेत त्यांत स्त्रीहरण मला जास्त पसंत आहे. घरचीं माणसं विरुद्ध असतांना

रमणी आपल्या वल्लभाबरोबर पळून गेल्याची जशी अनेक उदाहरणं आहेत तशी वल्लभानीं रमणीच्या संगनमतानं तिला पळवून नेल्याचींही अनंत उदाहरणं आहेत.

**कामाक्ष०**—सौदामिनीला पळवून न्यावं म्हणतोस!

**चारु०**—या मुत्सद्याच्या कुशाग्र बुद्धीला हाच एक उपाय सुचतो आहे!

**कामाक्ष०**—दुसरा कांहीं उपाय!

**चारु०**—सौदामिनीच्या बाबतींत दुसरा कोणताही उपाय उपयोगी नाहीं. असं पहा सरकार! आपलं तिच्यावर प्रेम आहे.

**कामाक्ष०**—नुसतं प्रेमच काय पण ती माझा पंचप्राण आहे.

**चारु०**—( स्व. ) म्हणूनच तुमचा प्राण तळमळतो आहे. ( उ. ) कबूल येथं तुमच्या व माझ्या विचारांचा संधी झाला. पण तिचं तुमच्यावर प्रेम नाहीं—नका—विचार करूं नका—परवाच्या प्रकारावरून या तरतरीत मेंदूच्या मुत्सद्यांनीं तें ताडलं आहे.

**कामाक्ष०**—तिचं आज जरी माझ्यावर प्रेम नसलं तरी—

**चारु०**—पुढें मागं बसेल यांत संशय नाहीं—अगोदर प्रेम नसलेली जोडी पुढं स्नेहसंबंधानंतर अत्यंत गोडीनं वागतांना दिसते. मुत्सद्याचा आडाखा आहे हा!

**कामाक्ष०**—यांत शंकाच नाहीं. तिचं आज जरी त्या बंडखोरावर प्रेम असलं तरी ती माझी सम्राज्ञी झाल्यावर माझ्यावर खात्रीनं प्रेम करील.

**चारु०**—त्या आशेवर तूर्त रहायला हरकत नाहीं.

**कामाक्ष०**—म्हणजे!

**चारु०**—बायका कधीं कुणावर कुठं आणि कसं प्रेम करतील याचा बिलकूल थांग पत्ता लागणार नाहीं.

**कामाक्ष०**—स्त्री जातीबद्दल काय ही तुझी अनुदार भावना!

**चारु०**—सरकार या वृद्धाला बायकांचा फार फार कटु अनुभव आला आहे. या अनुभवाकरतां मी सात लग्नाचे प्रयोग करून आठवा प्रयोग अनुभवतो आहे. अहो शहाण्यांनीं देखील बायकांवर भलताच विश्वास ठेवूं नये. भगवान् विष्णूनं आपल्या लक्ष्मीला पादसंवाहन करायला ठेवून तिच्यावर शेषाचा जहरी पहारा ठेवला आहे. तरी देखील त्या पहाऱ्यांतून ती निसटतेच—छे! छे! छे! स्त्री सारखा चंचल प्राणी उभ्या दुनियेंत नसेल. मनुष्याच्या कुंडलींतले ग्रह ग्रहमानाप्रमाणं पुढें मागे होतात, परंतु ग्रहांतला मगळ आणि शुक्र जिवंत ग्रह सकाळ पासून मध्यरात्रीं पर्यंत सारखे बदलत असतात.

**कामाक्ष०**—सौदामिनी तशी दिसत नाहीं.

**चारु०**—दिसणं आणि असणं यांत फार फरक आहे. पण ही वाटाघाट कशाला! सौदामिनीसाहेबांच्या बाबतींत वरील उपाय योजावा लागेल. हें माझं मुत्सद्दी मत अगदीं ठाम ठरलेलं आहे. बोला मग कसं काय करायचं!

**कामाक्ष०**-काय वाटेल तें करून तिची प्राप्ती करून घ्यायची. मग या बाबतींत कोणताही प्रसंग ओढवला, प्रजा नाराज झाली तरी त्याची पर्वा नाहीं अगर दिक्कत नाहीं. सौदामिनी सम्राज्ञी झाल्याशिवाय माझ्या मनाला समाधान वाटणार नाहीं. तूं सुचविलेला उपाय मला पसंत आहे पण हें कसं काय करायचं—

**चारु०**–ते तुमचं तुम्हीं पहा—मुत्सद्याला त्याच्याशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं. मुत्सद्याची बुद्धी ह्मणजे युक्तींची प्रयोगशाळा असते युक्ती सुचवणं हेंच आम्हां मुरलेल्या मुत्सद्यांचं काम

**कामाक्ष०**–ठीक आहे! मी पुढच्या सर्व गोष्टी करीन—पण ध्यानांत असूंदे कीं या पैकीं एक अवाक्षर देखील बाहेर फुटता कामां नये; सौदामिनीला मी गुपचुपपणें नाहींशी करणार आहे

**चारु०**–असली कामं गुपचूपच झालीं पाहिजेत स्फोट झाला तर कार्य सफलच होणार नाहीं. आपण काळजी करूं नका—पुन्हां जरी आपण स्वतः मला यातलं अक्षर विचारलंत तरी देखील मी सांगणार नाहीं. ( स्व. ) स्मरण शक्तीचा अभाव आहे ही गोष्ट निराळी!

**कामाक्ष०**–ठीक आहे. मी आतां त्याच उद्योगाला लागतो.

( जातो. )

**चारु०**–मला देखील आमच्या तिच्या नव्या उद्योगांवर बारकाईनं नजर ठेविली पाहिजे. नाहींतर मुत्सद्दीपणांत या मुत्सद्यावर तिची मात होऊन माझेच दांत माझ्या घशांत जातील.

( जातो. )

## अंक १ ला.

### प्रवेश ६ वा.

[ धनशीलाचें घर–धैर्यशील–सौदामिनी–धनशील
राजा कामाक्ष व सैन्य. ]

**धैर्यशील०**–सौदामिनी, तुझ्यावर विश्वास ठेवून अशी वंचना केलीस ना!

**सौदा०**–महाराज! आपला गैरसमज होण्यासारखं माझं वर्तन झालं आहे खरं. मी लग्नाच्या वेळांत आपल्या दृष्टीला पडले पण मी तरी त्याला काय करूं!

**धैर्यशील०**-वृद्ध धनशीलाशी लग्न कर! सौदामिनी त्या धनवंत धनशीलाच्या श्रीमंतींत तुझे दिवस सुखानं जातील. माझ्या संसारांत तुला सौख्य मिळणार नाहीं.

—पद्य—

**नाहीं मुळीं सुख सार निपाद वरित विपिनता ॥धृ०॥**
**वैभव सविता मिळवित सौख्या दीना सुधा विफलता ॥**
**निर्धन विपदा विषसम लोकीं खलाबला वितरिता ॥१॥**

**सौदा०**–महाराज! या अभागिनीच्या हृदयावर शद्बांचे प्रहार करून तिला दुखवूं नका! मला श्रीमंतीपेक्षां पैशांची शीलांची नी प्रेमाची अधिक किंमत आहे.

**धैर्य०**—मघाच्या तुझ्या वर्तनावरून त्याची जाणीव मला झालेली आहे. स्त्रियांचा स्वभाव श्रीमंतीकडे जसा चटकन वळतो तसा गरीबीकडे आणि प्रेमाकडे मुळींच वळत नाहीं! मी जर धनशीलासारखा द्रव्यांध असतो अगर रत्नपूरच्या माझ्या हक्काच्या सिंहासनावर अधिष्ठीत असतो तर सौदामिनी तूं माझा धिःकार करून वचनभंग केला नसतास!

**सौदा०**—महाराज! ही सौदामिनी तशा वृत्तीची नाहीं! प्रेमापरीस संपत्तीचा हिला लोभही नाहीं व अपेक्षाही नाहीं! माझं आपल्यावर किती प्रेम आहे हें त्या परमेश्वरालाच माहीत.—

—पद्य—

**प्रेममूर्ती मानुनी धन पाद पद्मीं वाहिलें मन ॥**
**प्रीत रंगीं रंगलें मन रूप रंगीं गुंगलें जन ॥ धृ० ॥**
**हृदयीं देव पूजिला शुद्ध भाव ओपिला ॥**
**सुम सुसंगीं गुंतलें तन ॥ १ ॥**

इतकी आपल्या मनाची खात्री पटवून दिली तरी ती पटत नाहीं! दुर्दैव माझं दुसरं काय!

**धैर्य०**—तूं कसली दुर्दैवी! खरा दुर्दैवी मीच तुझ्यावर विश्वास ठेवून मी नाहक फसलों.

**सौदा०**—महाराज! धनशीलाशीं मी लग्न करीन असं आपल्याला वाटलं तरी कसं!

**धैर्य०**—तुझ्या या अलंकारावरून आणि विवाहाच्या पोषाखावरून!

**सौदा०**–तसं जरी कुणाला वाटलं तरी लग्नाच्या पूर्वींचा हा माझा सोबती ( जंबीया दाखवून ) आपला गैरसमज दूर नाहीं कां करणार! धनशीलानीं माझी निर्वाणीची विनंती मान्य केली नसती तर मी हा खंजीर छातींत खूपसून घेतला असता.

**धैर्य०**–शाबास सौदामिनी या उत्तरानं तूं या धैर्यशीलाला देखील लाजवलंस!

**सौदा०**–आतां झाला ना दूर गैरसमज.

**धैर्य०**–झाला! मनांतलं किल्मीष साफ नाहींसं झालं.

—पद्य—

**सुहासिनी सुभाषिणीं सुधाजनीं॥**
**तव वच मधु सुखवी मदीय मन॥ धृ० ॥**
**नव परिणय भव पूर्ण चंद्र उदित होत॥**
**प्रेमल भ्रित व्योमीं॥ जाई क्रांत रिझवित तनमन ॥१॥**

**सौदा०**–आतां माझ्या जिवांत जीव आला.

**धन०**–(प्र. क.) शाबास! चांगलं चालवलंत हे! आहां तुम्हांला एवढ्या करतां कां मी आश्रय दिला! अतिथीधर्म चांगला पाळलांत कीं! लग्नाला आमंत्रण करून बोलावलेल्यानं वधू हरणाचा प्रयत्न करावा तसा हा प्रकार झाला! बेशरमपणाची कमाल झाली. सौदामिनी फार चांगल केलंस हें! असं करतांना आपल्या मनाची नसली तर या वृद्धाची भीति मनांत बाळगायाची होती!

**सौदा०**—पितृदेव-

**धन०**—पितृदेव-

**धैर्य०**—आमात्य, सौदामिनीची दृष्टि यथार्थ आहे!

**धन०**—माझ्याकडे पितृभावनेनं पाहण्याचा हिच्या दृष्टीचा यथार्थपणा तुमच्याकडं वल्लभानुनय दृष्टीनं पाहण्यानं मला पटवून देण्याचा हिचा बेत मी समजलों.

**सौदा०**—विनय सोडून स्पष्ट बोलते त्याची क्षमा करा. धनशील महाराज-

**धन०**—काय सांगणार मला-हेंच कीं नाहीं आमच्या घरांत आलेला अतिथी माझ्या प्रेमाचा देव आहे!

**सौदा०**—दुसरं तें काय सांगणार. पितृदेव, माझ्या प्रेमाची प्राणप्रतिष्ठाच आहे-

**धन०**—आणि तूं यीच्या कुलाची कुलप्रतिष्ठा आहेस!

**सौदा०**—हो-

**धन०**—छे! छे! सौदामिनी ही तुझी निवड मला पसंत नाहीं. आहो अभ्यागत-आपण आलांत तसे परत जा. हिचं लग्न आपल्याशीं करून देण्यांत येणार नाहीं.

**सौदा०**—महाराज! असा निर्धार करून मला संकटांत लोटूं नका.

**धैर्य०**—मग काय आपण हिचं करग्रहण करणार!

**धन०**—नाहीं! असा प्रकार करून मी माझं हसं करून घेणार नाहीं.

**धैर्य०**—मघाशीं केलेल्या प्रकारावरून मला तसं वाटलं!

धन०—मघाच्या प्रकारावरून तुह्मांला तसं वाटणं सहाजीक होतं. पण मी या पोरीच्या प्रेमाची कसोटी पाहण्याकरतांच तसा प्रसंग घडवून आणला.

सौदा०—मग काय! सम्राटाच्या हातावर माझ्या प्रेमाचं दान सोडणार!

धन०—सम्राटाच्या हातावर तुझ्या प्रेमाचं दान! सौदामिनी ही गोष्ट हा धनशील जिवंत असें पर्यंत होणार नाहीं! मी तुझा वल्लभ योजून ठेवला आहे!

धैर्य०—तो कोणता! रानावनांत हिंडणारा बंडखोर कीं काय!

धन०—नाहीं तो देखील नाहीं!

सौदा०—आणखी माझ्या प्रेमाचें किती धिंडवडे होणार आहेत कुणाला माहिती!

धैर्य०—मग या सौदामिनीचा वल्लभ तरी कोण?

धन०—भवितव्यता ठरविल तो.

सौदा०—मला या संदिग्ध भाषेनं कांहींच समजनासं झालं आहे.

धन०—सौदामिनी कोणत्याही कार्यांत संदग्धिपणा असूंच नये जो कोणी पुरुष राजा कामाक्षाच मस्तक मला आणून देईल त्यालाच मी तुला अर्पण करीन.

सौदा०—आतां माझ्या जिवांत जीव आला!

धैर्य०—माझ्या प्रतिज्ञतेला ही सुंदर जोड मिळाली!

धन०—चक्रवर्तीच्या हक्कदाराला देशत्याग करायला लावल्या बद्दल आणि या मानी धनशीलाची घनघोर मानखंडना केल्या

बद्दल सम्राटाचा मला सूड घ्यायचा आहे आणि म्हणूनच मी मनाशीं सांगितल्या प्रमाणं निर्धार केलेला !

धैर्य०—निर्धार कायम आहे या बद्दल मला वचन द्या !

धन०—हे घ्या वचन. या कुलपुरुषांच्या समक्ष मी आपणांस असं निश्चित वचन देतो कीं जो कोणी पुरुष सम्राटाचं मस्तक मला आणून देईल त्याला माझी सौदामिनी मी आनंदानं अर्पण करीन.

धैर्य०—ठीक आहे येतो मी—

—पद्य—

खल नृप बल करी ठार ॥
शौर्या दावुनी पुरविन मनिषा ॥
करी न शपथ मम विमल अनाथा ॥ धृ० ॥
वाहवुनी अरि रुधीर धारा ॥
लोळवीन मम पायीं रिपु असा ॥ १ ॥

( सौदामिनीकडे पाहात जातो ती मधुरहास्य करते )

धन०—सौदामिनी तूं ही माझ्या प्रतिज्ञेचा विचार कर. (जातो)

सौदा०—धनशीलानीं घातलेली अट इकडच्या पथ्यावरच पडली आहे. खरंच माझ्या आशावृक्षाला समाधानाची पालवी फुटणार अशी माझी मनदेवता मला सांगत आहे. मानसपूजेची सांगता मनासारखी होणार म्हणावयाची !

—पद्य—

लाभे जिवाची मम ज्योती आतां ॥
ने विलया ती अघवार्ता ॥ धृ० ॥
दासीस कांत हा लाभावा जन्मोजन्मीं ॥
करुणा करी आदिनाथा ॥
या समया ही शुभकांता ॥ १ ॥

**मृणालिनी**०—ताईसाहेब! चला चला लौकर-

**सौदा**०—सदानकदा तुझी आपली घाई!

**मृणा**०--घाई कसली! चारुशीलेनं मला असं कळवलं कीं राजा कामाक्ष आपल्या अनुयायांसह इथं येऊन आपल्याला जबरदस्तीनं पळवून नेणार आहेत.

**सौदा**०—हायरे दैवा! मृणाल-

**कामाक्ष**०–(अनुयायांसह येतो) चला लौकर अटपा! तो थेरडा येण्यापूर्वीं हिला घेऊन चला!

**सौदा**०—धांवाहो धांवा-अमात्य धैर्यशील महाराज, धांवाहो धांवा-

**कामाक्ष**०—खबरदार एक शद्ब बोलशील तर-बांधा हिच्या मुसक्या!

( अनुयायीं तसं करतात. )

**कामाक्ष**०—सौदामिनी सम्राज्ञी कशी होते नाहीं तेंच पाहतो!

अंक पहिला समाप्त.

# अंक २ रा.



## प्रवेश १ ला.

**स्थळः**—कामाक्षाचा दिवाणखाना.

[ **पात्रें**—कामाक्ष-रुद्रशील व चारुशील. ]

**रुद्रशील०**-महाराज माझ्या विनंतीचा काय विचार केला!

**कामाक्ष०**-रुद्रशील आम्हीं तुमच्या विनंतीचा फार फार विचार केला पण मोठ्या खेदाची गोष्ट आहे.

**रुद्रशील०**-ती कोणती!

**कामाक्ष०**-आपल्या विनंतिप्रमाणं आम्हांला करतां येणार नाहीं!

**रुद्रशील०**-महाराज, आजपर्यंत या रुद्रपूरच्या राजांनीं कोणत्याही बाबतींत कुणालाही विनंति केली नाहीं, अर्ज, विनंति वशिला या मानखंडनेच्या तीन गोष्टींचा या रुद्रशीलाला तिटकारा आहे. स्वतःच्या फायद्याकरितां अथवा दुसऱ्याच्या फायद्याकरितां आज तागायत मी विनंति केलेली नाहीं—

**कामाक्ष०**-तुमच्या अंतःकरणाचा असा कणखरपणा आम्हां जवळ विनंति करण्यांत फुलापेक्षांही मृदु कसा झाला! जन्मांत विनंति न करणाऱ्या राजानं याच वेळीं आमच्या चरणीं विनंति अर्ज कां रुजू केला!

**रुद्रशील०**-मित्रधर्मामुळं!

**कामाक्ष०**-कुणाचा मित्रधर्म!

**रुद्रशील०**-सौदामिनीच्या पित्याचा आणि या रुद्रशीलाचा!

**कामाक्ष०**-मित्र मेल्यावर त्याच्या मित्रधर्माचा आलेला उमाळा सहेतुकच असतो. रुद्रशील मित्रधर्माची माया पसरून आमच्या हातीं आलेली शिकार मेहरबानीनं तुमच्या स्वाधीन करण्याइतके आम्हीं नालायक नाहीं. त्या अमात्याप्रमाणं तुमचंही मन तिच्यावर बसलं आहे ना!

**रुद्रशील०**-महाराज! मी आपल्या छत्राखालचा राजा असलों तरी भलता बोल सहन करून घेणार नाहीं. शशीशीलाची पोर म्हणजे या रुद्रशीलाची पोर आहे. तिचं संरक्षण करण पिता या नात्यानं माझं कर्तव्य आहे. धनशीलासारखा-कन्या शोभणाऱ्या मित्राच्या पोरीवर पापी नजर ठेवण्याचा मूर्खपणा रुद्रशील केव्हांहि करणार नाहीं. इतकंच काय पण तशी गोष्ट दुसऱ्याला करून देणार नाहीं.

**कामाक्ष०**-तुमच्या विरोधाला आम्हीं काडीची किंमत देत नाहीं. रुद्रशील! तुमचा आमचा सलोखा रहावा असं तुम्हांला वाटत असेल तर सौदामिनीच्या मुक्ततेची विनंति मागं घ्या-आणि तिला तुमच्या हातानं आमची सम्राज्ञी करा!

**रुद्रशील०**-काय म्हणता सम्राट!

**कामाक्ष०**-शशीशीलाच्यापोरीच्या कन्यादानाचं उदक तुम्हीं आमच्या हातावर सोडलं पाहिजे.

**रुद्रशील०**-आतां उदकाचं कारण काय!

**कामाक्ष०**—याचा अर्थ!

**रुद्रशील०**—तिला तुम्हीं जबरदस्तीनं पळवून नेली आहे! कोणत्याही सज्जनाला न शोभणारं असं पापी कृत्य तुमच्या हातून घडलं आहे.

**कामाक्ष०**—बस्स! ज्यास्त वटवट नको! आम्हांला उपदेश करण्याची तुमची लायकी नाहीं.

**रुद्रशील०**—रियासतींतल्या पोरींबाळींवर पापी नजर ठेवणाऱ्या सम्राटाला उपदेश करण्याची माझी लायकी नाहीं हें खरं! पण—

**कामाक्ष०**—पण काय!

**रुद्रशील०**—माझं कर्तव्य आहे. शशीशीलाच्या पोरीचंच काय पण कोणत्याही स्त्रीचं शील संरक्षण करणं हें राजा या नात्यानं माझं कर्तव्यच आहे.

**कामाक्ष०**—रुद्रशील, तुम्हीं ल्हान तोंडीं मोठा घांस घेत आहां. तुम्हीं आमच्या छत्राखालींल मामुली राजे आहांत. आम्हीं तुमच्या सारख्या अनेक राजांचे राजराजेश्वर आहोंत. तुमचीं सिंहासनं आमच्या हातीं आहेत–या सर्व गोष्टींचा विचार करून आणि आमची सार्वभौम शक्ति लक्षांत ठेवून या पुढं काय बोलायचं तें बोला?

**रुद्रशील०**—आपल्या उपदेशाची कांहींच अवश्यकता नाहीं. मी या सर्व गोष्टीं चांगल्या रीतीनं ध्यान्यांत ठेवल्या आहेत. हें सर्व लक्षांत घेऊनच मी आपल्या जवळ सौदामिनीची मागणी केली आहे.

**कामाक्ष०**—सौदामिनीचं नख देखील तुमच्या नजरेला पडणार नाहीं. आलांत तसे परत जा नाहींतर नाहक भलताच प्रसंग ओढवेल!

**रुद्र०**—कांहीं झालं तरी सौदामिनीला घेतल्याशिवाय मी रुद्रपूरला परत जाणार नाहीं.

**कामाक्ष०**—कसलाही प्रसंग आला तरी आम्हीं सौदामिनीला मुक्त करून तुमच्या हवालीं करणार नाहीं.

**रुद्र०**—महाराज—भलत्याच थरावर गोष्ट जाणं बरं नाहीं.

**कामाक्ष०**—गेली तरी चालेल! रुद्रशील आतांपर्यंत आपली उद्दाम भाषा आम्हीं ऐकून घेतली. यापुढें एक अवाक्षरही न काढतां चालते व्हा—

**रुद्र०**—तें कां म्हणून!

**कामाक्ष०**—आम्हीं सांगतों म्हणून!

**रुद्र०**—तुम्हीं! तुम्हीं कोण!

**कामाक्ष०**—राजराजेश्वर-सम्राट!

**रुद्र०**—सम्राट!

**कामाक्ष०**—कां आश्चर्य का वाटलं?

**रुद्र०**—आश्चर्य कसलं! अत्यंत दुःख वाटतं आहे.

**कामाक्ष०**—तें कां?

**रुद्र०**—तुमच्या सारख्याला सम्राट म्हणणं हें खरोखर दुःख आहे!

**कामाक्ष०**—रुद्रशील! तुम्ही फारच उन्मत्त झालेले आहांत—

**रुद्र०**—आपल्या पेक्षां किती तरी कमी!

**कामा०**—उन्मत झालेल्या राजाची राजराजेश्वर काय व्यवस्था करतात माहीत आहे ना!

**रुद्र०**—पूर्ण माहीत आहे. असा प्रसंग येणार याची खूण गांठ मनांत धरुनच मी येथें आलों आहे. सम्राटाच्या अगर राजराजेश्वराच्या दडपशाहीची भीति इतर नामर्द राजांना—रुद्रशीलाला नाहीं. ज्यांना आपलीं राज्यं देखील सांभाळतां येत नाहींत अगर ज्यांच्या मनगटांत नवी राज्यं निर्माण करण्याची ताकद नसते त्यांनीं सम्राटाच्या चरणांवर लोटांगणं घालून त्याच्या दुर्वतनावर पांघरुण घालावं. मला तसं करण्याचं कांहीं एक कारण नाहीं. मी राजा आहे-स्वतंत्र आहे—

**कामा०**—राजा—पण आमच्या अंकींत आहेस!

**रुद्र०**—अंकींत असलों तरी मनानं स्वतंत्र आहे.

**कामाक्ष०**—रुद्रशील फार भडकू लागलास; सम्राटासमोर बेछूट बोल बोलल्याबद्दल आमची क्षमा माग नाहीं तर—

**रुद्रशील०**—नाहींतर काय होईल?

**कामाक्ष०**—सिंहासनावरून काढून वनवास भोगण्याची पाळी येईल.

**रुद्र०**-तुमच्या सारखा दिवटा सम्राट झाला त्याच वेळीं अनेक राजांच्या नशीबीं राजसंन्यास लिहीला गेला. सत्यापुढं—शीलापुढं मला माझ्या तक्ताची पर्वा नाहीं—अनीतीच्या व अन्यायाच्या पायावर उभारलेल्या तक्तावर आरुढ होण्यापेक्षां वनवास पतकरणं फार बरं!

**कामाक्ष०**—या उन्मताला अशीच शिक्षा केली पाहिजे. रुद्राक्ष—

**रुद्राक्ष०**—( प्र. क. ) संम्राटांचा जयजयकार असो.

**कामाक्ष०**—उतरा या उन्मत राजाचीं राजभूषणं—आणि रुद्रपुरांत आत्तांच्या आतां सैन्य पाठवून त्यावर आपली मोहर लावा-या उन्मत्ताला आम्हीं गादीवरून काढून टाकलं आहे. आणि ध्यानांत ठेवा- याच्या प्रजेनीं जर तुम्हांला विरोध केला तर लष्करी कायदा पुकारून व्यवस्था करा- रुद्रशील जा- चालते व्हा—आणि आपल्या नशीबीं आलेला वनवास संह्याद्रीवनांत आनंदानं घालवा—

**रुद्रशील०**—कामाक्ष! आज जसा तू सम्राटसत्तेच्या जोरावर माझ्या हक्काच्या सिंहासनावरून अन्यायानं काढलं आहेस- त्याच प्रमाण असा एक दिवस लौकरच्च उगवेल कीं तुलाही संम्राटसिंहासनावरून खेंचून वनवास भोगावा लागेल.

**कामाक्ष०**—सध्यां तर तूं भोग—जा- चालता हो.



## अंक २ रा.

### प्रवेश २ रा.

( स्थळः-चारुशीलाचें घर. )

[ पात्रें:—चारुशीला व चारुकान्त. ]

चारुशीला०-

—पद्य—

झाळित जीव प्रेम माया काळीं प्रियानव ॥धृ०॥
नच मोही नाथा ॥ कांता मानिनी गेहा ॥
वृद्ध दिलावर लोटी दुरी असा भव प्रियानव ॥१॥
प्रीत न्यारी भारी डोळे जादुगारी ॥
प्रेम सुधाकर लोकीं वांछी नवोनव प्रियानव ॥२॥

मी परवां माझं हृदय उघड करून विनंति केली पण त्या पंडीताच्या मनावर कांहीं एक परिणाम झाला नाहीं. मग काय त्यांना अंतःकरणच नाहीं कीं काय! छे तसं नसेलच. या मेल्या पुरुषांची अगदीं अशीच खोड असते. एकाद्या स्त्रीनं आपलं प्रेम दाखविलं कीं मेल्यांना उसना आव येतो. माझ्या सुखाचं स्थान म्हणून मी त्याला विनवलं पण त्यांनीं मला कांहींच उत्तर दिलं नाहीं-वृद्ध तरुणी विवाहामुळं माझ्या सारख्या तरुणींची खात्रीनं कुचंबणा होत असेल. ही मेली शास्त्रंच आडवीं येतात. जुन्या

पुराण्या शास्त्रांमुळं माझ्यासारख्या नव्या नवतीचं आयुष्य फुकट जात आहे– पण छे–मी माझं सोन्यासारखं आयुष्य बरी फुकट जाऊं देईन. हें वृद्ध ध्यान दूर लोटून माझ्या मनासारखा तरुण पाहीन नी त्याच्याशीं सुखाचा नवा संसार थाटीन. अगबाई हे कोण आलं–इश्श हा काय मेला पोषाख करणं झालं?

चारुकान्त०–वेळ आली म्हणूनच असा पोषाख केला आहे.

चारुशीला०–ह्मणजे काय!

चारुकान्त०–अशौच्य!

चारुशीला०–तें कसलं!

चारुकान्त०–शास्त्र आडवं आलं–मी इकडं यायला निघालों तो शास्त्र आडव आलं–

चारुशीला०–जवळपासचं कोणी दगावलं कीं काय! सासुबाई–

चारुकान्त०–दहा वर्षांपूर्वींच पटकीनं आटोपली राधेकृष्ण.

चारुशीला०–मामंजी–

चारुकान्त०–मामी बरोबर सहगमन करते झाले.

चारुशीला०–वन्सं–

चारुकान्त०–पाळण्यांतूनच मेहुण्याबरोबर पलायन करत्या झाल्या राधेकृष्ण.

चारुशीला०–बरं भाऊजी!

चारुकान्त०–बिचाऱ्याच्या जन्मापूर्वीं मातोश्रींनं संतती नियमन सुरुं केल्यामुळं हें जग त्याला दिसलं नाहीं. राधेकृष्ण.

चारुशीला०–मग झालं तरी काय! अशौच्य कसलं!

चारु०–सवत्स धेनूचं–

**चारुशीला**०–गाईचं–नवलच म्हणायचं–

**चारु**०–नवल नाहीं–अगदीं शास्त्राधार आहे. आपल्या दर्शनार्थ निघालों तों वाटेंत एक गाय आपल्या नुकत्याच जन्मलेल्या वत्सासह मेलेली आढळली बिचारी अनाथ–आधार नाहीं अनाथाला पदर मोडून अग्नीसंस्कार द्यावा असं शास्त्र पडलं–म्हणून तपास केला तेव्हां असं आढळलं कीं, ती आमच्या पिढीतल्या मूळ पुरुषाची तेव्हां ती झाली आमच्या देशांतली–सुतक धरणं भाग पडलं–धर्म मयूरवाचा आधार दृष्टीसमोर आला राधेकृष्ण–

**चारुशीला**०–भलतंच काय बरळतां–शास्त्रानं वेड लागेल तुम्हांला.

**चारुकान्त**०–मी शास्त्रानं वेडा होणार नाहीं.

**चारुशीला**०–पण मी झालें आहेना या शास्त्र्यामुळं वेडी! हं सोडा हा मूर्खपणा–

**चारु**०–हा मूर्खपणा नाहीं.

**चारुशीला**०–बरं शहाणपणा–

**चारुकान्त**०–छे! छे! हा शास्त्रीपणा आहे.

**चारु**०–बरं चला पाहूं–परवाच्या पर्वाचा उपसंहार करूं चला.

—पद्य—

**राजसा चला चतुरा ॥**
**भरज्वानीची नवती तारा ॥**

विनवी पांखरा अधिरा ॥ धृ० ॥
मधु बोलोनी जरा हांव भाव शिणगारा
कुरवाळोनी करा धन्य नार गुलजारा ॥
जीवहि होत बावरा सुधीरा ॥

चारुकान्त०–हं मी अस्पृश्य आहे–शिवाय अशौच्यांत शास्त्रार्थ सांगू नये असं शास्त्र आहे पर्वाचा उपसंहार मंगलस्नाना नंतर–राधेकृष्ण–(जातो)

चारुशीला०–जे गाढवं धरावं तें बुचंच! तिकडं मुत्सद्याची ती तऱ्हा आ नी इकडं या शास्त्र्याची अशी रीत! दोन्हीं–कडून माझ्या प्रेमाची कुचंबणा चालली आहे अन माझ्या संसाराचं होणार तरी काय हेंच कळत नाहीं. इकडचा वृद्धाआधार सोडावा नी या शास्त्र्याच्या तरुण आधाराला राहावं असं मी मनांत योजलं होतं! पण त्याचा असा परिणाम होतो आहे–शास्त्र शिकविण्याच्या निमित्तानं चारुकान्ताला घरांत आणलं–पण या वेड्याला शास्त्रापुढं काहींच सुचनासं झालं आहे. आतां करूं तरी काय! छे असं करून उपयोग नाहीं–शास्त्र्याला चांगलं पुन्हां विचारावं नाहीं म्हटलं तर दुसऱ्यांशीं संसार थाटावा. हा अस्संच करीन–माझं तारुण्य मी अशी नाहींग बाई फुकट घालविणार–चांगला–अगबाई हा कोण तिसरा–

रुद्राक्ष०–(येतो मुत्सद्दी आहेत कां घरांत!

चारुशीला०–कोण मुत्सद्दी!

रुद्राक्ष०–घरं चुकलों कीं काय!

**चारु०**—छे घर बरोबर आहे—पण मुत्सद्दी कोण! आमचे ते—

**रुद्राक्ष०**—ते तुमचे कीं कोण हें मला माहित नाहीं—

**चारु०**—पण मला माहीत आहेना! अहो मी त्यांचीच!

**रुद्राक्ष०**—असं- मी सम्राटाकडून चारुशीलांना बोलवायला आलों आहे.

**चारु०**—आणखी कोणत्या भानगडीं करायच्या आहेत. मला पळवून न्यायचं आहे कीं काय!

**रुद्राक्ष०**—तें मला माहीत नाहीं—अहो बाई ते आले कीं त्यांना पाठवून द्या बरं!

**चारु०**—देईन बरं—

**रुद्राक्ष०**—काय हा मुत्सद्याचा संसार आहे. (जातो)

**चारुशीला०**—गेली मेली धिडका! सुंदर स्वरुपाच्या ध्यानांत होते तो मेला हा रुद्राक्ष पुढं उभा! जाऊंदे बाई असला अरसिक विचारच नको. मी बाई अगदीं—अस्सं—अस्सं करीन—

—पद्य—

**प्रीति बोल बोलोनी रिझवीन राया ॥**
**संकेत दावी नयनांनीं मोहोनी माया ॥ धृ० ॥**
**भोळी भाळी कोमल काया ॥**
**झुलविते जगाया प्रेमें या ॥ १ ॥**

## अंक २ रा.

### प्रवेश ३ रा.

[ स्थळः--जयस्तंभ-कामाक्ष व त्याचें सैन्य, भिल्ल, घनशील, रुद्रशील, धैर्यशील. ]

**कामाक्ष०**—हीच ना ती जागा! आणि हाच तो आमच्या वैऱ्याचा जयस्तंभ.

**रुद्राक्ष०**—होय सरकार, रत्नपूरच्या कुलपुरुषांचा धैर्यशीलाच्या कुलपुरुषाचा हाच तो जयस्तंभ!

**कामाक्ष०**—बंडखोर रोज याच्या दर्शनाला येतो नाहीं!

**रुद्राक्ष०**—रोज येत असतो. कालींचं दर्शन आणि या स्तंभाचें पूजन कधींही चुकत नाहीं.

**कामाक्ष०**—ठीक आहे. आज त्याची पुरी कंबख्ती भरलीच ह्मणून समजा. आपल्या लोकांना एका बाजूला दबा धरून बसायला सांगा. तो आला आणि आम्हीं संकेताचा बोल बोललों ह्मणजे एक जात तरवारीची शर्त करा.

**रुद्राक्ष०**—महाराजांची आज्ञा शिरसामान्य आहे.

**कामाक्ष०**—चक्रवर्तीचा हा कुळपुरुष आणि त्यांचा रानावनांतून हिंडणारा वंशज आज आमच्या तरवारीला बळी पडणार आहे.

**रुद्राक्ष०**—असं झाल्याशिवाय रत्नपूरचें चक्रवर्तीत्व महाराजांना कायमचं लाभणार नाहीं.

**कामाक्ष०**-तेवढ्यां करतांच आम्ही जातीनं हजर राहीलों आहोंत. हा अभिमानानं उभा राहिलेला चक्रवर्ती घराण्याचा जयस्तंभ आम्हीं उध्वस्त करून टाकणार आहोंत. आणि त्या जागीं आमच्या वडलांचा जयस्तंभ उभा करणार आहोंत. आजपासून चक्रवर्तींचा संबंध सुटला! कामाक्षाच्या कुलाचा अंमल सुरू झाला आहे. चक्रवर्तींचीं स्मृतींचिन्हें पार धुळीला मिळविल्याशिवाय प्रजेच्या अंतःकरणांतील त्याच्या विषयींचा आदर कमी होणार नाहीं.

**रुद्राक्ष०**-नवीन राजे असंच करीत असतात.

**कामाक्ष०**-ही एक राजनीतींल महत्वाची गोष्ट आहे. पूर्वींच्या राजांची एकही स्मृति, कसलंही स्मारक आम्हीं आमच्या राजवटीत ठेवणार नाहीं. असें हाजारों जयस्तंभ उखडून टाकू; त्यांच्या नांवानं ओळखले जाणारे वाडे उध्वस्थ करु; त्यांच्या समाध्यावरून गाढवांचे नांगर फिरवू-रुद्राक्ष आम्हीं या कामावर तुमची योजना केली आहे.

**रुद्राक्ष०**-बाकीचीं सर्व कामं मी करीन- पण सरकार हा जयस्तंभ मात्र आपण उध्वस्थ केला पाहिजे.

**कामाक्ष०**-तो मान आमचा आहे. ही कामगिरी आम्हीं जातीनं करणार आहोंत. चक्रवर्ती घराण्याच्या जयस्तंभा, तुझी शंभर वर्षें भरलीं! इतकें दिवस तूं या रत्नपूरच्या सरहद्दीवर पहारा केलास पण आतां तुझा शवट होणार! हा कामाक्ष रत्नपूरच्या चक्रवर्तीपदावर आरुढ झालेला हा कामाक्ष तुला छिन्नविछीन्न करून त्या जागीं आमच्या वडलांचा जयस्तंभ उभारणार! रुद्राक्ष हा जयस्तंभ आतांच्या आतां छिन्नविछीन्न करू कां!

रुद्राक्ष०–बंडखोराच्या देखत करण्यांत जें शौर्य आहे तें आतां नाहीं.

कामाक्ष०–योग्य तुमचा सल्ला योग्य आहे. त्याच्या देखतच हा जयस्तंभ छिन्नविछीन्न करूं–इतकंच नव्हे तर त्याच्या हातून आमच्या वडलांचा जयस्तंभ या जागीं उभारूं.

रुद्रशील०–( प्र. क. ) कोणरे तूं! आमच्या महाराजांच्या पवित्र मूर्तीचा धिःकार करणारा तूं कोण!

कामाक्ष०–तुला जीवाचा कंटाळा आला आहे वाटतं!

रुद्राक्ष०–अरे हे या रत्नपूरचे कामाक्ष महाराज आहेत त्यांना नमस्कार कर.

रुद्रशील०–कुणाला नमस्कार करूं!

रुद्राक्ष०–आमच्या कामाक्ष महाराजांना चक्रवर्तींना

रुद्र०–दुसऱ्याचं राज्य घशांत घालणाऱ्या या राजाला! नाहीं कधींही करणार नाहीं! ही मान फक्त या जयस्तंभापुढं वाकेल!

कामाक्ष०–या तरवारीनं तुझी मान वाकविल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

रुद्र०–तरवार!

रुद्राक्ष०–हो हो तरवार!

रुद्र०–अरे! असलीं शस्त्रं आमचीं शेंबडीं पोरं खेळांत वापरतात. शस्त्रांची भीति आमच्या सारख्या भिल्लांना कसली!

कामाक्ष०–तूं या ठिकाणीं कां आलास!

रुद्र०–कर्तव्य बजावण्याकरतां!

कामाक्ष०–कसलं कर्तव्य!

रुद्र०-या जयस्तंभाच्या संरक्षणाचं!

कामाक्ष०-या पुढं तुला तुझं कर्तव्य करायला नको.

रुद्र०- तें कां!

कामाक्ष०-आम्हीं हा जयस्तंभ येथून फेंकून देणार आहोंत!

रुद्र०-अस्स! हा चक्रवर्तीचा अभिमानी येथें असतांना तुम्हीं याला फेंकून देणार!

कामाक्ष०-अरे यालाच काय! पण तुला देखील!

रुद्र०-उन्मत्ता परमेश्वराचा अपमान केल्याबद्दल अगोदर याची क्षमा माग.

रुद्राक्ष०-सरकार ज्या जिव्हेनीं आपला अपमान केला ती जिव्हा मुळासकट उपटून टाकली पाहिजे.

कामाक्ष०-सबूर! रुद्राक्ष सबूर करा! असल्या मपकाला तरवार कशाला? याच्या देखत या जयस्तंभाला अशी लाथ मारतो.

( लाथ मारावयास जातो तो अनेक भिल्ल येतात. )

सर्व भिल्ल०-कालीमाते कीं जय! चक्रवर्ती कीं जय!

कामाक्ष०-रुद्राक्ष आपल्या सैन्याला इशारा द्या! चला जा लौकर. ( रुद्राक्ष जावयास निघतो तो एक भिल्ल त्याचा हात धरून त्याला उभा करतो. )

भिल्ल०-खबरदार बाहेर जाशील तर!

कामाक्ष०-रुद्राक्ष जा बाहेर लौकर.

रुद्राक्ष०-सरकार-मला सोडवाहो सोडवा!

कामाक्ष०–हरामखोरा सोड त्याला! नाहींतर आमच्या शस्त्राला नाहक बळी पडशील!

धैर्य०–(प्र. क.) धैर्यशीलाच्या।दिमतीच्या लोकांचे प्राण इतके स्वस्त नाहींत! अधमा या जयस्तंभाकरतां माझे हजारों सवंगडी आपलं रक्त सांडतील!

कामाक्ष०–कोण धैर्यशील!

धैर्य० हो! धैर्यशील! चक्रवर्तीची औलाद रत्नपूरच्या गादीचा खरा हक्कदार, आणि या-पवित्र जयस्तंभाचा आजन्म सेवक.

कामाक्ष०–रत्नपूरची गादी? आतां त्या गादीवर तुझा कसला हक्क? आम्हीं त्या सिंव्हांसनाचें सम्राट आहोंत!

धैर्य०–तुझ्या वडलांच्या अमानुष्य कृत्यानीं माझ्या बांबाचा खून होऊन, आमच्या फितुरी सरदारांच्या बळावर तू माझं हक्काचं सिंहासन भ्रष्ट केलं आहेस! पण कामाक्ष आतां तें रत्नपूरचं, चक्रवर्तीचं सिंहासन तुझ्याकडं फार दिवस राहणार नाहीं.

कामाक्ष०–याचा अर्थ!

धैर्यशील०–त्या सिंहासनावर हा धैर्यशील अधिष्ठीत होणार!

कामाक्ष०–या जन्मीं कीं पुढच्या!

धनशील०–(प्र. क.) याच जन्मीं! थोडक्याच काळांत!

कामाक्ष०–कोण राजद्रोहीं अमात्य!

धनशील०–कोण राजद्रोही!

कामाक्ष०–तुम्हीं राजद्रोही!

धनशिल०–कोणत्या राजाशीं मी विद्रोह केला!

**कामाक्ष०**–या कामाक्ष राजाशीं !

**धनशील०**–कामाक्ष राजा ! चक्रवर्तीचा हा चिरंजीव आमचा राजा आहे.

**रुद्राक्ष०**–ह्मणजे हे राजे नाहींत कीं काय !

**धनशील०**–हे तुझ्या सारख्या फितुरी कुत्र्याचे राजे असतील. पण आमचे नाहींत—हक्कदाराला देशोधडीला लावून बिगर हक्कदारानें राज्यपदावर आरुढ होण्यानं त्याला खरं राजेपद प्राप्त होत नाहीं.

**कामाक्ष०**–रुद्राक्ष ! या थेरड्याला गिरफदार करा !

**धैर्य०**–अमात्याच्या केसाला जर धक्का लागला तर या जय-स्तंभाच्या वर तुमच्या रक्ताचा अभिषेक केला जाईल !

**कामाक्ष०**–बंडखोरा–एक शब्द अधिक काढ कीं पहा काय होतं तें !

**धैर्य०**–कोण बंडखोर !

**कामाक्ष०**–तूं आमच्या रियासतींत बंडाळी माजविणारा तूं बंडखोर !

**धनशील०**–दुसऱ्याच्या पोरीं पळवणारा तूं राजा वाटतं !

**कामाक्ष०**–थेरड्यानीं ऐन वेळीं काळजाला हात घातला !

**धैर्य०**–आमात्य याचा अर्थ काय !

**धन०**–यालाच विचारा !

**कामाक्ष०**–सौदामिनी आम्ही आमची सम्राज्ञी करणार आहोंत हें मागेंच जाहीर केलें आहे, सध्यां ती आमच्या कबज्यांत आहे.

धैर्य०--एका अबलेवर अत्याचार करणाऱ्या नराधमा, या पुण्य पुरुषाची क्षमा माग आणि सौदामिनीला मुक्त करण्याचा हुकूम दे.

कामाक्ष०–(स्व.) मोठा पेंच पडला आहे. सैन्य देखील आयत्या वेळीं कसं स्वस्थ बसलं कुणाला ठाऊक! (उघड) रुद्राक्ष नौबत झडवा आणि सैन्याला इशारा द्या. (रुद्राक्ष न कळत जातो)

धनशील०–काय! काय निर्णय ठरला!

धैर्य०–माझ्या अटी कबूल आहेत किंवा नाहीं! नसल्या तर हें माझं शस्त्र तयार आहे. चल आटप.

[(भूत.) धैर्यशील–पुण्य पुरुषांच्या जयस्तंभापुढं असा अत्याचार नको. तुझी प्रतिज्ञापूर्ती अन्य वेळीं कर!]

धनशील०–महाराज हा चक्रवर्तीचा संदेश ध्यानांत ठेवा!

धैर्य०–बाबा आपली आज्ञा शिरसामान्य आहे. राजा– जा या वेळीं तुला क्षमा केली आहे. दोस्तहो, या कामाक्षाला मुकाट्यान जाऊंद्या!

कामाक्ष०– या बंडखोराचा निःपात केल्याशिवाय माझं अंतःकरण शांत होणार नाहीं. (जातो)



## अंक २ रा.

### प्रवेश ४ था.

[ पात्रें:—चारुशील—धनशील—चारुकान्त ]

**चारुशील०**—झाला मुत्सद्याचा जय झाला! कामाक्ष महाराजांनीं गुपचूपपणें सौदामिनीला पळवून आणली! आतां माझा दर्जा वाढणार! छे! वाढणार कसला वाढलेलाच आहे. इतके दिवस मी नुसताच मुत्सद्दी होतो पण आतां मुत्सद्याचा मुत्सद्दी झालों आहे. पहा ह्मणावं माझ्याकडें—आमच्या तिला ह्मणावं पहा या मुत्सद्याच्या मुत्सद्याकडे. काय डोक्याचा प्रभाव आहे तरी एका डोक्यानं केवढी कामागरी केली ही! जर कां मला एका ऐवजीं दोन डोकीं असतीं तर मी त्या थेरड्या अमात्याची जागाच पटकावली असती.

**धनशील०**—(वेषांतरानें) ज्याची मुलाखत पाहिजे होती तोच दत्त ह्मणून पुढं उभा; याला छेडून सौदामिनीचा ठावठिकाण विचारला पाहिजे.

**चारुशील०**—धनशीलाला ह्मणे मोठा अभिमान आहे. या जगांत कोरडा अभिमान काय कामाचा! माझ्या सारखा ओला अभिमान पाहिजे. कामाक्ष महाराजांची एक कामगिरी बजावली कीं पदव्यांची खैरात झालीच. मुत्सद्याची बुद्धी कधींही वाया जाणार नाहीं.

**धनशील०**—(स्व.) सौदामिनीच्या बाबतींतील याला माहिती असलीच पाहिजे.

**चारुशील०**-माहिती असो वा नसो आपल्याला सर्व माहित आहे असें दडपून सांगावं. असें न सांगितलं तर मुत्सद्दी कसला!

**धनशील०**-(स्व.) मूर्खाला मुत्सद्दीपणाचं वेड लागलेल दिसत आहे.

**चारुशील०**-माझ्या विजयाची बातमी केव्हां एकदां तिला सांगेन असं मला झालं आहे! पण आतां ती कोठें सापडेल!

**चारुकान्त०**-(प्र. क.) ती त्याच्या जवळ सांपडेल. तिच्या जवळ तो व त्याच्या जवळ ती असा शास्त्रीय सिद्धांत आहे.

**चारुशील०**-घरांत-छे! घरांत असेल तर शपथ!

**चारुकान्त०**-घरांत शपथेला राहून परघराची प्रतिज्ञा पुरी करण्याला प्रेम शास्त्राची सर्रास परवानगी आहे राधेकृष्ण.

**चारुशील०**-परवानगी शिवायच बाहेर जाते.!

**चारुकान्त०**-बाहेर पडायला घरच्या यजमानाची परवानगी घेऊं नये असं प्रेमाचं स्वछंदी शास्त्र बजावून सांगत आहे.

**धनशील०**-हा दुसरा कोण? त्याचा साथीदार कीं काय! जरा बाजूला उभं राहून याचं भाषण ऐकावं.

**चारुशील०**-छे! छे! साऱ्या दिवसांत गांवभर गजघंटेसारखी मिरवीत असते.

**चारुकान्त०**-गरतीची फिरती झाली म्हणजे घंटेला अनेक शंख भेटायचेच.

**चारु०**-असेल तेथून शोधून काढतो आणि माझ्या कर्तबगारीची महती सांगतो. बहुतेक ती त्या चारुकान्ताकडे गेली असावी.

**चारुकान्त०**-मुत्सद्दी महाराज-

चारुशील०- अरे! नांव काढतांच पुढं उभा-

चारुकान्त०—नाम घेता फुका पुढें उभा चारुसखा!

चारुशील०—चारुसखा! अरेरे! हे शब्द ऐकतांच मुत्सद्याच्या हृदयाचें पाणी झालं.

चारुकान्त०—पत्नीच्या डोळ्यांत पाणी असलं कीं पतिच्या डोळ्यांतून पाणी निघायचंच. पाणिनीचा हें नवं संशोधन आहे राधेकृष्ण.

चारुशील०—चारुकान्त—तूं अगदीं माझ्या पाळतीवरच राहतोस मुत्सद्यावर पाळत उपयोगी नाहीं.

चारुकान्त०—तुह्माला माझ्या बद्दल संशय येऊ नये ह्मणून मी तुमच्या पाठीमागे असतो.

चारुशील०—अगदी पाठ पुरवलीस माझी.

चारुकान्त०—पण पाठलाग नाहींना केला!

चारुशील०—पाठीचं धीरड केलं पाहिजे-पण मी पडलों मुत्सद्दी—मुत्सद्यांनीं फक्त बोलाव—कृती करतां कामानये.

चारुकान्त०—पण यजमान—प्रकृती कोठे आहे!

चारुशील०—काय मानभावी पणा करतो आहे! जसे कांहीं तिचा ठाव ठिकाणा याला माहितच नाहीं!

चारुकान्त०—कां स्तब्ध कां!

चारुशील०—स्तब्ध न राहू तर काय करूं! तिनं माझ्या तोंडाला पान पुसण्याचा बेत केला आहे!

चारुकान्त०—छे! छे! चारुशीलेच्या स्वभावाच तुह्मांला आकलन करतां आलं नाहीं! राधेकृष्ण.

**चारुशील०**–म्हणूनच तू तिच्या स्वभावचं आकलन करणं चालविलं आहेस नाहीं!

**चारुकान्त०**–छे! छे! तसं कांहीं नाहीं!

**चारुशील०**–तसं कांहीं नाहीं! मग असं कांहीं तरी असेल!

**चारुकान्त०**–छट् तुमच्या गळ्याशपथ-तसं कांहीं नाहीं.

**चारुशलि०**–माझ्या गळ्यावर तुझा फार दिवसाचा डोळा आहे म्हणा–पण मुत्सद्याचा गळा म्हणजे पानाचा मळा नव्हे.

**चारु०**–तुम्ही फारचबुवा शंकेखोर!

**चारुशील०**–शंकेखोर! अरे मला सगळं माहीत आहे पण बोलायचं कसं! आपलेच दांत आणि आपलेच ओठ.

**चारुकान्त०**–म्हणजे घरांतलच ओष्ठरामायण राधेकृष्ण–

**चारुशील०**–तिचं रामायण मी केव्हांच संपविलं असतं पण मी मुत्सद्दी–तेव्हां–

**चारुकान्त०**–रामायणांतली सीता कशी संपवावी असन्चना!

**चारु०**–ते जाउंद आणि सांग पाहू ती कुठं आहे!

**चारुकान्त०**–तिचाच तर मी शोध करतो आहे. कुठं आहे ती!

**चारु०**–काय बेशरम आहेसरे! पत्नीची पती जवळ चौकशी–

**चारुकान्त०**–देवीची चौकशी देवाजवळच करावी असं शास्त्र सांगत आहे. राधेकृष्ण!

**चारुशील०**–असं कां! मग पहा देवीच्या साथींत कुठें तरी जा–तिला शोधून आण–

**चारुकान्त०**–पण आज अशी का तहान लागली आहे.

चारुशील०- तुला शास्त्र्याला काय समजतं! माझा प्रचंड विजय झाला आहे. त्या विजयाची बातमी तिला सांगायची आहे. जा तिला शोधून काढ!

चारुकान्त०-जीर्ण पतीची नवी नवरी शोधून काढण्याच्या कामगीरींत कामदेवा या शास्त्र्याला यश दे-(जातो)

चारुशील०-सौदामिनी आतां सम्राटाची सम्राज्ञी होणार वाहवा! मुत्सद्याची मौज उडणार! भाग्याचा तारा चमकणार! कीर्तीचा झेंडा फडकणार! मुत्सद्दी महान् मुत्सद्दी होणार! पण ती कशी आली नाहीं. ( धनशीलाला पाहून ) वाहवा! आली एकदाची ऐकलंस कां! माझ्या युक्ती मुळं सम्राटांनीं सौदामिनीला पळविलं आहे. आतां ते तिला सम्राज्ञी करणार! तुझा नवरा मुख्य मुत्सद्दी होणार हो!

धनशील०-हरामखोरा-

चारुशील०-अरे बापरे! तिच्या ऐवजीं तोच आला कीं; म्हाळसेचा धांवा केला तो मार्तंडच प्रसन्न झाला-बा मुत्सद्या सांभाळरे आपल्या डोक्याला-

धनशील०-कोणरे तूं!

चारुशील०-मुत्सद्दी.

धनशील०-सरळ उत्तर दे नाहीं तर डोकेच उडवीन!

चारुशील०-डोकं शाबूद ठेऊन देहाचा खुशाल मुडदा पाडा कारण मी मुत्सद्दी आहे. डोकं उडवलं तर माझं मुत्सद्दीपण नाहिसं होईल; बायको पेक्षां मी माझ्या डोक्याला फारफार जपतोहो!

धनशील०- किती मूर्ख आहे हा!



अमात्य धनशील०—

चारुशील०—म्हणूनच मुत्सद्दी आहे हा! अहो तुमच्या पाया पडतो माझं डोकं शाबूत ठेवा! शरण चिठ्ठी लिहून देतो! पण मुत्सद्याचं भांडवल तेवढं कायम ठेवा हो.

धनशील०–तुझी आणि येथल्या सम्राटाची दाट ओळख आहे नाहीं!

चारु०—नुसती दाट कां अगदीं नाजुक ओळख आहे—हा मुत्सद्दी त्यांच्या नाजुक मुत्सद्देगीरींतला आहे.. राजकारणांतल्या डाव्या बाजूचं खातं सम्राटांनी मला तोडून दिलं आहे!

धनशील०—मग चांगलाच सांपडलास माझ्या हातांत!

चारुशील०—सांधी कोपऱ्यांत सांपडलेल्या मुत्सद्यावर हात टाकणं वीराला शोभत नाहीं.

धनशील०—दुसऱ्याच्या पोरी बाळी राजाच्या जनानखान्यांत पोंचवणं शोभतं वाटतं मुत्सद्याला!

चारुशील०—तुम्हाला ही माझ्या विजयाची बातमी कळली आं! खूष-मुत्सद्यांचा मुत्सद्दी अगदीं खूष झाला!

धनशील०—खुषींत गाजर खाणाऱ्या मुत्सद्या माझ्याशी गांठ आहे लक्षांत ठेव!

चारु०—याच्या धमकीनं मी तर अर्धा मेला झालों आहे! हे कालपुरुषा हा मुत्सद्दी तुला अनन्य भावानं कायमचा शरण आला आहे. वाटेल त्या अटीवर तह करून ही लढाई संपीव बाबा! तह—अट—लढाई—संधी—हा मुत्सद्यांचा शब्दकोष मला आयत्या वेळीं चांगला सुचला.

धनशील०—वाटेल ती अट कबूल आहे!

**चारु०**—डोकं उडविण्याच्या अटी शिवाय बाकीच्या सर्व अटी मला कबूल आहेत.

**धनशील०**—कामाक्षानी ज्या पोरीला पळवून नेली आहे. तिच्या बरोबर पत्ता सांगशील तरच तुला जिवदान मिळेल.

**चारु०**—याचं तिच्यावर प्रेम आहे कीं काय!

**धनशील०**—कारे! तोंडाचा दरवाजा उघडून कसला विचार करतो आहेस.

**चारु०**—सम्राटांनीं तिला गुप्त जागीं ठेवलं असून त्या जागेवर सक्त पहारा ठेवला आहे. हें मी कसं बरं सांगू तुम्हाला.

**धनशील०**—या तोंडानं सांग नाहीं तर याच जागीं भुतख्याचा अवतार समाप्त करीन.

**चारु०**—पत्ता सांगावाच लागेल–त्या शिवाय सही सलामत सुटका कशी होणार–पण कांहो तुम्ही बंडखोर नाहींना! तसं असाल तर मला दहाहजारांचे बक्षीस मिळेल.

**धनशील०**—किती भाग्यवान् आहेस तूं!

**चारु०**–( स्व. ) खात्रीनं हाच बंडखोर असावा. मुत्सद्दी दहाहजार दिनांराचें बक्षीस पटकाविणार!

**धन०**—मीच तो बंडखोर आहे–मला सौदामिनीचं अखेरच दर्शन घ्यायचं आहे!

**चारु०**—ठीक आहे ती कामगिरी हा मुत्सद्दी करील. चला माझ्याबरोबर मी नेमका तिथेच नेऊन पोंचवतो–

**धन०**—चल लौकर–

**चारु०**—पण लक्षांत ठेवा—मी आल्याशिवाय तेथून परत फिरूं नका—

**धन०**- आतां मी तुझ्या हातांत आहे सांगशील तसा वागेन.

**चारु०**-झाला मुत्सद्याचा पुन्हा जय झाला-तद्दाची भाषा करून शत्रू पुन्हा गोटांत आणला-उगीच नाहीं मुत्सद्दी—चला—
[ जातात. ]

---

## अंक २ रा.

### प्रवेश ५ वा.

[ स्थळः- रुद्रपूर. पात्रें:-रुद्रमणी, भद्रशील, रुद्राक्ष, कटाक्ष, शिपाई आणि धैर्यशील व जनता. ]

**भद्रशील०**—मासाहेब, आपण नेहमी चिंतातुर का बरें दिसता. राजघराण्यांतील माणसाला चिंता कसली!

**रुद्रमणी०**—युवराज, राजघराण्यांतील माणसालाच अधिक चिंता असतं. वरवर पाहणाऱ्या लोकांना राजा अगर त्याचे कुटुंब सुखी दिसत असलं तरी तें सुखी नसतं! गरीबांना फक्त पोटाचीच काळजी असतें. पण राजे लोकांना सर्व प्रजेची काळजी असतें.

**भद्रशील०**—राजकुलांत जन्माला येणं म्हणजे जन्मभर काळजीत पडणंच होय!

**रुद्रमणी०**—असंच म्हणता येणार नाहीं. राजकुलांत जन्म घेतल्यानं जन्म घेणाऱ्या स्त्री पुरुषावर फार मोठी जबाबदारी येऊन पडतें. कुटुंबातल्या कर्त्या पुरुषावर जशी सर्व कुटुंबाची जबाबदारी असतें तशीच किंबहुना त्याच्यापेक्षांही ज्यास्त अशी राजावर असतें. सर्व प्रजेच्या योगक्षमाची काळजी राजालाच वाहावी लागतें.

**भद्रशील०**—सर्वच राजे आपण म्हणतां त्याप्रमाणें वागतात कां ?

**रुद्रमणी०**—नाहीं ! सर्व राजे अशा प्रमाणें वागत नाहींत. ते आपल्या वरील जबाबदारी न ओळखतां राजा म्हणजे उपभोग्य प्राणी अशी मनाची भलतीच समजूत करून घेऊन वाटेल तसे वागतात.

**भद्रशील०**—अशा राजांना राजे ह्मणतातच ना !

**रुद्रमणी०**—सत्ता हातीं असतें ह्मणून प्रजा त्यांना राजा ह्मणते पण प्रजेच्या अंतःकरणांत अशा राजाविषयीं असावी तशी सहानुभूती नसते. राजा हा प्रजेचा पालक आहे हें उदात्त तत्व राजेलोक विसरतात.

**भद्रशील०**—मामासाहेब मी जर राजा झालों तर प्रजेची सेवा अवश्य करीन.

—पद—

**त्यजुनिया जिवीत मम संपदा ॥**
**वारी प्रजेची आपदा ॥ धृ० ॥**

मानुनी जनता सेवीन विधीहा ॥
करी जन सुखकर खचित तदा ॥१॥

रुद्र०—युवराज, तुमचें हे विचार ऐकून मला अत्यंत समाधान वाटतें आहे. आपलं रुद्रपुर तुमच्या कारकीर्दींत रामराज्य अनुभवो.

भद्र०—मासाहेब आपलं जसं शिक्षण मिळेल तसा मी वागेन.

रुद्र०—युवराज! आपली मातृनिष्ठा खरंच हेवा करण्यासारखी आहे.

भद्र०—यांत हेवा करण्यासारखं काय आहे! मातृनिष्ठा हें मुला-मुलींचें कर्तव्य आहे. ज्याला मातृभक्ति करतां येत नाहीं त्याला कांहीं एक करतां यावयाचें नाहीं. मासाहेब मला रुद्रपुरच्या सिंहासनापेक्षां आपलेच चरण अत्यंत पवित्र आहेत. उद्यां रुद्रपूरचं सिंहासन मला मिळालं नाहीं तरी मला त्याचें कांहीं एक वाईट वाटणार नाहीं. पण हें मातृपद मी गमावलं तर मला अत्यंत वाईट वाटेल. जगांतल्या कोणत्याही पवित्र पदापेक्षां मतृापद अत्यंत पवित्र आहे.

—पद्य—

जननीपदा नच मोल या माता विशाला ॥ धृ० ॥
शुद्धसरिता दिव्य शुचिता मार्ग दावी सकलाला ॥ १ ॥
विमलनिधी हा सत्य सविता विफल जाणीं कमला ॥२॥

रुद्र०—दृष्टच काढावी माझ्या चिमण्या राजाची !

भद्र०—मासाहेब महाराज कां बरें आले नाहींत ! सौदामिनी आत्या त्यांच्या बरोबर येणार आहे ना !

रुद्रमणी०—येईल बरं युवराज. सौदामिनी स्वारी बरोबर खात्रीनं येईल. महाराज तसे परत येणार नाहींत.

भद्र०—सौदामिनी आल्या आली कीं मी तिला मुळींच जाऊ देणार नाहीं.

[आह्मी असा अत्याचार करूं देणार नाहीं. एक पाऊल पुढें टाका कीं या राजवाडयांत तुमच्या रक्ताचा अभिषेक झालाच ह्मणून समजा.]

रुद्र०—ही काय गडबड आहे!

भद्र०—थांबा मासाहेब मी पहातो काय आहे तें!

[रुद्राक्ष०—असं करण्याचा सम्राट कामाक्षांचा मला हुकुम आहे. मला विरोध कराल तर लष्करी कायदा पुकारुन मला माझं कर्तव्य बजावणं भाग पडेल.]

रुद्रमणी०—काय गडबड आहे! रुद्रपूरची जनता आमच्या राजवाडयांत कां जमली आहे?

लोक०—राणीसाहेब हा सरदार आमच्यावर अत्याचार करीत आहे.

भद्र०—कोण हो तुह्मी! आमच्या प्रजेवर आह्मी इथं असतांना भलताच हुकूम बजावून तिला दुःख देणारे तुह्मी कोण!

रुद्राक्ष०—मी सम्राट कामाक्षांचा एकनिष्ठ सेवक आहें!

रुद्र०—सम्राटांनी आपल्या एकनिष्ठ सेवकांना रुद्रपूरच्या जनतेवर अत्यचार करायला सांगितले आहे कीं काय?

रुद्राक्ष०—सम्राटानी रुद्रशील महाराजांना रुद्रपूरच्या सिंहासनावरून पदभ्रष्ट केलं आहे. आणि हें राज्य त्यानी आपल्या

ताब्यांत घेण्याचा मला हुकूम दिला आहे. त्या हुकमाची अंमल बजावणी करण्याला मी आलों आहे.

**जनता**०—आम्ही असा अत्याचार करूं देणार नाहीं.

**रुद्राक्ष**०—मी राज्य खालसा केल्याशिवाय राहणार नाहीं.

**भद्र**०—या तरवारीनें प्रतिकार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

**रुद्रमणी**०—महाराजाना पदभ्रष्ट करणं म्हणजे मामुली गोष्ट आहे असं तुमच्या सम्राटांना वाटलं काय?

**भद्र**०—आमचं हक्काचं रुद्रपूर सहजा सहजीं घशांत उतरेल असं सम्राट समजले काय! अहो एकनिष्ठ आलांत तसं चालते व्हा. रत्नपूर सम्राटानाच्च काय पण कोणालाही खालसा करतां येणार नाहीं.

**रुद्राक्ष**०—याचा काय अर्थ?

**रुद्र**०—रुद्रपूरची गादी आमच्या हक्काची गादी आहे ती कांहीं सम्राटानी आम्हांला मेहरनजर करून दिलेली देणगी नव्हे. एखाद्याच राज्य दुष्ट उपायानें घशांत घालण्याचा काळ आतां राहिलेला नाहीं. जा—सम्राटांना—उलट असा निरोप कळवा कीं, आमच्या जीवांत जीव आहे तो पर्यंत आमचं रुद्रपूर तुह्मांला मिळणार नाहीं.

**रुद्राक्ष**०—रुद्रपूरवर सम्राटांचा शिक्का मोर्तब केल्याशिवाय मी परत जाणार नाहीं.

**भद्र**०—आमचं राज्य घशांत घालायला आलेल्या राक्षसाला यमसदनाला पाठविल्याशिवाय आम्ही रहाणार नाहीं.

**रुद्राक्ष**०—राणीसाहेब, युवराज, सम्राटांच्या आज्ञेचा भंग करून त्यांची अवकृपा करून घेऊ नका.

रुद्र०-आपण असला मायावी उपदेश आह्मला करूं नका

भद्र०-सम्राटाच्या कृपेची आम्हांला बिलकुल पर्वा नाहीं.

रुद्राक्ष०-अशा दुराग्रहानं माझा नाईलाज होईल-माझ्या दिमतीला असलेल्या लष्कराला सर्व शहर जबरदस्तीनें काबीज करा अशी आज्ञा करावी लागेल. मुकाट्यानें राज्य स्वाधीन करा आणि मोकळे व्हा!

जनता०-राणी सरकार-काय वाटेल तें होवो आम्ही यांच्या अत्याचाराला बळीं पडायला तयार आहोंत. पण आपण आमच रुद्रपूर आमची जन्मभूमी यांच्या हवालीं करूं नका!

भद्र०-लोकहो शांत रहा. तुमचा आह्माला पाठींबा आहे ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. आमचं रुद्रपूर आम्ही कधींही सोडणार नाहीं.

रुद्रमणी०-अहो सरदार! आल्या पावलीं परत जा नाहींतर-

रुद्रा०-कटाक्ष-सैन्याला माझी आज्ञा कळवा-सर्व शहर जबरदस्तीनं कबजांत घ्यायची शिकस्त करा—

रुद्रमणी०-लोकहो! सेनापतींना आमचा हुकूम कळवा आणि सैन्याला शिकस्त करून प्रजेचें संरक्षण करण्याची खबरदारी घ्यायला सांगा-युवराज चला-प्रजेच्या संरक्षणाकरितां आमच्या बरोबर चला-लोकहो-चला-आम्ही तुमच्या संरक्षणार्थ सिद्ध आहोंत— ( लोक जातात. )

रुद्राक्ष०-राणी सरकार आपल्याला येथून हालतां येणार नाहीं.

रुद्रमणी०-तें कां?

रुद्राक्ष०-आपण आमच्या कैदी आहांत!

**भद्रशील०**--हरामखोरा! कोण कुणाचा कैदी!

**रुद्राक्ष०**-आपण दोघेही आमच्या सम्राटांचे कैदी अहांत-मुकाट्यानं स्वाधीन व्हा नाहींतर जबरदस्तीनें कैद करावं लागेल.

**रुद्रमणी०**-सरदार! आपण कोणत्या घमेंडींत आहांत-मी मामुली स्त्री आहे असा तुमचा समज झाला आहे काय! एक कदम पुढें या म्हणजे या राजवाड्यांत तुमच्या रक्ताची रंगपंचमी झालीच म्हणून समजा.

**रुद्राक्ष०**-रक्तपाताचा प्रसंग न येईल तर फार बरं!

**भद्रशील०**--राजकारणाला रक्तपाताशिवाय रंगच नाहीं. तरवारीशिवाय राज्य मिळत नाहीं अथवा असलेल राज्य सुरक्षीत ठेवतां येत नाहीं.

—पद्य—

**शस्त्राविना होई कधीना मातृभूमी जगतीं अवना ॥ धृ० ॥**
**बोलफोल नित करिन मुक्तता ॥**
**रणसंभ्रमा खड्ग भाले योग्य समर्थी ते वीरभूषणा ॥ १ ॥**

**रुद्राक्ष०**-मला तलवारींचं तत्वज्ञान फार चांगलं समजतं आहे. तुमच्या सारख्यांची शिकवण मला नको मुकाट्यानें कैद व्हा नाहींतर-

**कटाक्ष०**-( प्र. क. ) सरदारसाहेब! इथं स्वस्थ कां उभे राहीलात. तिकडे रत्नपूरच्या दिमतीला बंडखोराचं सैन्य आलं असून आपल्या सैन्याची त्यानें धूळाधाण उडवून दिली आहे. चला चला लौकर

**रुद्राक्ष**०—काय वाटेल ते असो. मला यांना कैद केल्याशिवाय येथून येतां येत नाहीं.

**कटाक्ष**०—सरदार अशानं रुद्रपूर कबज्यांत येणार नाहीं. बंडखोराचं सैन्य आपल्या सैन्यावर तुटून पडलं असून त्याला प्रजेचा भयंकर पाठींबा आहे. रत्नपूरचं सैन्य निकराने लढत आहे.

**रुद्राक्ष**०—कटाक्ष—या दोघांना एकदम गिरफदार कर. आणि याना घेऊन चल—याना पकडल्यावर प्रजा हताश होऊन आपला आग्रह सोडून देईल. चल—कर याना अटक—कां—स्वस्थ कां!

**कटाक्ष**०—सरदार—हा नोकरीचा राजीनामा घ्या. असला अन्याय मी करणार नाहीं. इतकच नव्हे तर आपल्याला देखील असा अन्याय करून देणार नाहीं.

**भद्रशील**०—शाबास—कटाक्ष या मांगापेक्षां तुम्हीच श्रेष्ठ आहांत—

**रुद्राक्ष**०—अस्सं काय! थांब—मीच याना अटक करतो—

[ अटक करावयास जातो तोच धैर्यशील भिल्लासह येतो ]

**धैर्यशील**०—अगोदर या उन्मताला पकडा—[लोक पकडतात] रत्नपूरच्या राणीचं, युवराजाचं आणि प्रजेचं संरक्षण करणारा हा धैर्यशील येथें असतां कामाक्षाच्या सरदारांचीच काय पण कामाक्षाची देखील छाती नाहीं. अधमा—आपल्या अन्यायाला विरोध केल्याबद्दल रुद्रपूरच राज्य खालसा करणाऱ्या कामाक्षाला कळीव कीं, हा धैर्यशील जिवंत असें पर्यंत कोणत्याही न्यायी राजाचं राज्य कोणालाही खालसा करतां येणार नाहीं. वेताळ या पढाला रत्नपूरच्या हद्दी बाहेर सोडून द्या—पण थांब—या माऊलीचा अपमान केल्या बद्दल हीची क्षमा माग—

**रुद्राक्ष**०–सम्राटाच्या कार्याला विरोध केल्याचं प्रायश्चित मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

**धैर्यशील**०–तें मिळेल तेव्हां मिळेल पण या माऊलीचा अपमान केल्याबद्दलचं प्रायश्चित भोग–चल–माग हीची क्षमा–वेताळ–[ वेताळ त्याचे मस्तक–रुद्रमणीच्या चरणावर नमवितो ] जा–याला–घेऊन जा–आणि कामाक्षाचें सैन्य हद्दीच्या बाहेर गेल्या नंतर आपल्या लोकांना संकेत स्थळीं जमायला सांगा–[ वेताळ नमस्कार करून रुद्राक्षाला धक्के मारीत नेतो. ]

**रुद्र**०–महाराज आपण भगवान् श्रीकृष्णासारखें ऐन वेळीं आलांत–युवराज हेंच बरं खरें सम्राट!

**भद्रशील**०–सम्राटाना हा भद्रशील अभिवादन करतो आहे.

**धैर्य**०–युवराज उठा–रुद्रमणी–रुद्रशीलानी मला सर्व हाकिगत कळवली. ते तूर्त माझ्या लोकांत आहेत. कामाक्षाची आज्ञा त्यांच्याकडून समजतांच मी इकडे आलों.

**रुद्रमणी**०–आदी मायेनेच सांकड निवारलं हें!

**धैर्य**०–शक्तीमातेला सर्वांचीच काळजी आहे. तिच्या कृपेनं लौकरच सर्व गोष्टी यशस्वी होतील–तुम्ही स्वस्थ रहा–मात्र मी आमंत्रण करीन त्या वेळीं रत्नपूरला माझ्या सेवका बरोबर या–

**रुद्रमणी**०–महाराजांना इकाच्या सिंहासनावर बसलेले केव्हां एकदा डोळे भरून पाहीन असं मला झालं आहे.

**धैर्य**०–शक्ती माता काय करील तें खरं!

**भद्र**०–सत्याचा जय केव्हांहीं होणारच महाराज—

**धैर्य**०–युवराज आपलं म्हणणं सत्य आहे. बरं येतो मी.

रुद्र०-थोडी विश्रांती घेऊन—

धैर्य०—छे! छे! आतां विश्रांति कसली—कामाक्षाचा सूड घेतल्याशिवाय... रत्नपूरच्या तख्तावर अधिष्ठीत झाल्याशिवाय विश्रांति नाहीं.

—पद्य—

नच जिविता मुळीं शांती खलमती
अरी वधुनिया असुरा ॥ धृ० ॥
घोर कुटिल गर्वोद्धट झाला ॥
निर्दय नर खर मातला ॥
नृपपदवरी छलुनिया खदीरा ॥ १ ॥

———

## अंक २ रा.

### प्रवेश ६ वा.

स्थळ:—तळघर.

[ पात्रें:—सौदामिनी, कामाक्ष, चारुशील, धनशील, धैर्यशील रुद्रशील वगैरे ]

**सौदामिनी०**—मला या कामाक्षाचा अतिशय राग आला आहे. तो राग व्यक्ती म्हणून नव्हे तर राजा म्हणून, कामाक्षाची नीच कारस्थानं पाहिली, त्याची अपहरण बुद्धी अनुभवली म्हणजे

असं वाटतं कीं याला राजा तरी कसं म्हणावं! राजा ह्मणजे परमेश्वराचा अवतार अशी आमची सनातन भावना पण ती भावना या राजाला तरी कशी लावावी! हा परमेश्वर नसून सैतान आहे. त्याला पाहिलं कीं मला असं वाटतं—

—पद्य—

**नरवर लोकी ना शोभे नृपवर ॥ धृ० ॥**
**पांशुल पालन शासित जनता सदा विषयीं रत खर ॥ १ ॥**
**शील न न्याय न शासन सकला कदा सुनती नच नर ॥ २ ॥**

**कामाक्ष०**-(प्र. क.) सौदामिनी ! अखेर कुणाचा जय झाला!

**सौदामिनी०**- भवितव्यता ठरवील त्याचा!

**कामाक्ष०**—सम्राटाचं लीखीत भवितव्यतेच्या हातीं नसून तें आमच्या हातीं आहे. सम्राट म्हणजे प्रती परमेश्वर आहे.

**सौदामिनी०**—परमेश्वरी नांवाची पवित्रता तुमच्या नांवानं अपवित्रता ठरेल!

**कामाक्ष०**—पृथ्वीपती म्हणजे प्रत्येक्ष परमेश्वर नाहीं काय?

**सौदामिनी०**—हें सनातन तत्व जरीं खरं असलं तरी तें तुमच्या नांवाला शोभत नाहीं—तें तुमच्या नांवाला लावणं म्हणजे त्याची विटंबना करणं होय—

**कामाक्ष०**—ह्मणजे तुझ्या मतानं मी कोण आहे.

**सौदामिनी०**- तुह्मी ऐका कोण आहांत तें!

—पद्य—

शठखल नयहर शृगाल घोर दीन छलनता हे व्रत साजे ॥धृ०॥
गर्णी महिभारा खलबल सारा जनमन कुटील कुयश सजे ॥१॥

कामाक्ष०—सौदामिनी हा प्रत्यक्ष सम्राटाचा अपमान होतो आहे!

सौदामिनी०- सम्राट नांवाची तुह्मांला यत्किंचित किंमत वाटत असती तर तुमच्या हातून दुर्वर्तन झालंच नसतं.

कामाक्ष०—कोणतं दुर्वर्तन!

सौदा०—प्रजेवरील जुलूम

कामाक्ष०—कोणत्या प्रजेवर आह्मी जुलूम केला!

सौदा०—चक्रवर्तीच्या प्रजेवर—रत्नपूरच्या जनतेवर.

कामाक्ष०—रत्नपूरची जनता आमची रयत आहे, ती चक्रवर्तीची प्रजा कशी असेल!

सौदा०—रत्नपूरची जनता ही चक्रवर्तीचीच प्रजा आहे.

कामाक्ष०—नव्हे ती आमची रयत आहे. रयतेपैकीं एक जण देखील तुझ्या सारखं बरळत नाहीं.

सौदामिनी०—बिचारी खुळी प्रजा तुमच्या कारकीर्दींत स्पष्ट बोल कशी बोलणार! पण तिचं अंतःकरण ती कबुली देत नाहीं.

कामाक्ष०—प्रजेच्या अंतःकरणाची आह्मी बिलकुल पर्वा करीत नाहीं.

सौदामिनी०—ज्या सम्राटाला अंतःकरण नसतं तो आपल्या प्रजेची पर्वा करीत नाहीं. पण खरा सम्राट खरा चक्रवर्ती प्रजेच्या

अंतःकरणाची कदर बाळगून तिचीं अंतःकरणं काबीज करतो प्रजा ही राजाची देवता आहे.

**कामाक्ष०**–बिलकूल नाहीं–सम्राट अगर राजा हाच प्रजेचा परमेश्वर आहे. प्रजेला कोणी जरी अधीक किंमत देत असलं तरी ती त्याची भयंकर भूल आहे. ही विचारसरणी ह्मणजे एखाद्या माथेफीरूच्या–बंडखोराच्या कुजक्या डोक्यांतून निघालेली एक पोकळ शक्कल आहे. मला ही विचारसरणी नापसंत आहे. इतकंच नव्हे तर या विचारसरणीचा मी पहील्या प्रतीच्या कट्टा वैरी आहे. प्रजेला नसतं महत्व देणं ह्मणजे सम्राटानी आपल्या हातानं आपलं वर्चस्व कमी करून घेणं आहे.

**सौदामिनी०**–या विचारसरणीवरूनच तुह्मालां प्रजेचा परमेश्वर तरी कसं ह्मणावं नी तिच्या वरील जुलमाची तरी जाणीव कशी करून द्यावी!

**कामाक्ष०**–जेथें जुलूमच नाहीं तेथें जाणीव तरी कसली!

**सौदामिनी०**–जेथें प्रजेला किंमत नाहीं तेथें राजालाही किंमत नाहीं.

**कामाक्ष०**–राजा करतांच प्रजा आहे.

**सौदा०**–नाहीं प्रजे करतांच राजा आहे.

**कामाक्ष०**–आम्ही नसलों तर प्रजेला विचारणार कोण! राजा करतां राज्य आहे.

**सौदा०**–राज्य ह्मणजे नुसती जमीन नव्हे–प्रजा ह्मणजेच राज्य आहे–प्रजा आहे ह्मणून राज्य आहे आणि राजा आहे.

**कामाक्ष०**—सौदामिनी—आज आम्ही अनेक राजांचें राजे आहोंत हें ध्यानांत ठेवून शद्बांचा उच्चार कर.

**सौदा०**—सत्याला जगांत कशाचीही भीती नाहीं. मी ह्मणतें तीं सत्यें आहेत. ती उच्चारतांना मला तुमचीच काय पण परमेश्वराचीही भीती वाटणार नाहीं.

**कामाक्ष०**—परमेश्वराची वाटो वा न वाटो पण सम्राटाची भिती वाटलीच पाहिजे-आज आमच्या छत्राखालीं अनेक राजे आहेत—त्यांना आमची किती दहशत आहे याची तुला माहीती आहेच. रुद्रशीलाला एका क्षणांत तक्ता वरून खालीं ओढलाच कीं नाहीं. त्याचा वादविवाद पुरे झाला. तुझ्या मतानं आह्मी कसेंही असलों तरी त्याची मिमांसा आह्माला कर्तव्य नाहीं. आह्मी तुला या ठिकाणीं आणलं आहे. थोडक्याच काळांत तुला आमची सम्राज्ञी करण्याचा आमचा बेत आहे.

**सौदा०**—मी ह्मणते तोच हा जुलूम—एखाद्या अबलेवर असा अत्याचार करून आपल्या राजेपणाला कलंक लावून घेऊं नका.

**कामाक्ष०**—यांत जुलूम कसला आह्मी प्रजेचे मालक आहोंत.

**सौदा०**—महाराज हे शब्द राजेपणाला कमीपणा आणणारे आहेत

—पद्य—

जनता दिनोद्धरणा मानुनी जगांतरी चिरंतना॥धृ०॥
करित अवन नित पालना लोकपालनृपवर शासना॥
शोभे न्याये अरीना ॥ १ ॥

कामाक्ष०—पर्वा नाहीं. सौदामिनी आह्मी लौकरच सम्राटदीन साजरा करणार आहोंत त्या दिवशीं त्या मंगल प्रसंगी रत्नपूरच्या आमच्या सिंहासनावर तुला सम्राज्ञी ह्मणून बसलंच पाहीजे. ही गोष्ट तुला पसंत असो वा नसो पण ध्यानांत ठेव कीं असं घडवून आण त्या शिवाय आह्मी राहणार नाहीं. रत्नपूरच्या सिंहासनावर येउन आह्माला एक वर्ष होत आलं आहे. लौकरच नूतन वर्षाला सुरवात होईल त्या दिवशीं आह्मी सम्राटदीन साजरा करणार आहों सम्राटदीनाच्या मंगल प्रसंगी भलता प्रसंग न येईल याची जाणीव ठेवून काय करायचं याचा विचारकर, आणि सार्वभौमाची सम्राज्ञी होण्याची आलेली संधी भलत्याच भावनेला बळीं पडून दवडूं नको. (जातो)

सौदा०- सार्वभौमाची सम्राज्ञी - किती कर्णमधूर शब्द हे! पण हे शब्द मला विषारी वाटू लागले आहेत—सार्वभौमचं सिंहासन म्हणजे अनेक राज्याचें संरक्षण करणारं छत्र! पण यांची कल्पना किती स्वार्थी आहे बरं! कामाक्षा कुणाची भलती भावना हे लौकरच समजेल. याची ही दहशत ऐकून माझं मन द्रवेल असं या सम्राटाला नव्हे कामाक्षाला वाटलं नाहीं! माझ्या प्रेमाचं बलीदान मी याच्या चरणावर करीन इतक्या कमकुवत मनाची कां हीं सौदामिनी आहे. माझा निर्धार अढळ आहे नी धैर्यशील महाराजांवरील खऱ्या सम्राटावरील माझं प्रेमही अढळ आहे.

—पद्य—

हृदयीं स्थापिला सुजन गुणी भला ॥
ही वरीन तयाला माला ॥ ध्रु० ॥

राजसत्ता लोभ मनीना ॥
मानीन त्या कुलशीला ॥
वच सत्य तें कथीं बाला ॥ १ ॥

[ चारुशील सह धनशील येतो. ]

**धनशील०**—सौदामिनी !

**सौदा०**—कोण अमात्य—पितृदेव—

**धनशील०**—एका पोरीचं संरक्षण करतां न येणारा धनशील!

**सौदा०**—कामाक्षाच्या कामांधतेमुळं दुर्दैवान मी इथं आलें असलें तरी माझं संरक्षण करायला मी समर्थ आहे—अमात्य माझ्या संरक्षणाची तुह्मी मुळींच काळजी करुं नका.

**धनशील०**—याचा अर्थ काय! कामाक्ष किती क्रूर आहे जुलमी आहे—अहंमन्य आहे याची तुला कल्पना नाहीं.

**सौदा०**—चांगली कल्पना आहे.

**धन०**—असं माहित असून तूं आपलं संरक्षण करायला समर्थ आहेस; आश्चर्य आहे!

**सौदा०**—त्यांत आश्चर्य नाहीं—कामाक्षाच्या क्रोधापासून माझं संरक्षण जरी मला करतां आलं नाहीं—त्याच्या क्रोधाला मी बळीं पडले तरी माझं शील मी खात्रीनं रक्षण करीन.

**धन०**—ते कसं!

**सौदा०**—आजपर्यंत पातिव्रतानीं केलं तसं. किंवा परवा आपल्या निर्धाराच्या वेळीं केलं तसं.

**धन०**—शीलाला काडीचीही किंमत न देणाऱ्या कामाक्षापुढं तुझं शील कसं संरक्षण होणार!

**सौदा०**—आपण तरी माझ्या संरक्षणाकरतां काय करण्याचं योजिलं आहेत!

**धन०**—तुला या कामांधाच्या कचाट्यांतून सोडवून नेण्याकरता मी आलों आहे!

**सौदा०**—सोडवून नेऊन तुम्ही माझ्या शीलाचं संरक्षण कसं करणार!

**धन०**—तुझ्याशी विवाह करून!

**सौदा०**—म्हणजे एका कामांधाच्या पाशांतून मला सोडवून दुसऱ्या कामांधाच्या पाशांत अडकविणार ना! अमात्य-बोला-हेंच ना करणार!

**धन०**—सौदामिनी माझा मनोदय मी तुला पूर्वीच कळविला आहे.

**सौदा०**—अमात्य आपल्या मनोदयाची मला पूर्ण आठवण आहे. पण आपल्या वचनाची आठवण आपल्याला राहिलेली दिसत नाहीं आपल्या वचनाची जाणीव मी करून दिली पाहिजे असं नाहीं—पण आपण जशी माझ्या प्रेमाची कसोटी पाहिलीत तशीच मी ही पाहिली. आणि म्हणूनच म्हणतें कीं माझ्या शीलाचं संरक्षण करायला मी समर्थ आहे. कांहींही झालं कोणताही प्रसंग आला तरी ही सौदामिनी आपलं शील संरक्षण करून सम्राट दीनाच्या वेळीं कामाक्षाची सम्राज्ञी होणार नाहीं—

**धन०**—सम्राटदीन म्हणजे काय!

**सौदामिनी०**—ज्या दिवशीं कामाक्ष रत्नपूरच्या सिंहासनावर आरूढ झाला तो दिवस सम्राटदीन म्हणून साजरा करणार आहे.

**धनशील०**—असं सम्राटदीन काय! पाहूं कसा साजरा करतो तो!

**चारुशील०**-(प्र.क.)सरकार तो पहा बंडखोर! कसा नेमका आणून सोडला. आहे कीं नाहीं मुत्सद्दी. त्याच्या बरोबरचे लोक बाहेर उभे केले आहेत. द्या दहाहजार दिनार द्या उगीच नाहीं मुत्सद्याचं डोकं!

**कामाक्ष०**—आयताच सापडला म्हणायचा.

**चारु०**—आयता कसा या मुत्सद्यानी आणला ना हा!

**कामाक्ष०**—काय! बंडखोर!

**धन०**— कोण बंडखोर!

**कामाक्ष०**—आमचं तख्त काबीज करणारा! चक्रवर्तींचा देशो-धडीला लागलेला वंशज! आतां कोण कुणाचा सूड घेणार! तुझं मस्तक आमच्या हातीं आहे! बोल परवाच्या आमच्या अपमाना-बद्दल क्षमा मागतोस कीं या तुझ्या प्रेमदेवतेच्या चरणावर तुझं म-शीरकमल वाहण्याला आमच्या शस्त्राला भाग पाडतोस!

**धन०**-कामाक्ष! मी चक्रवर्तींचा वंशज नसून त्यांच्या गादीचा एकनिष्ठ सेवक आहे. पहा मी कोण आहे तो [ वेष काढतो ]

**कामाक्ष०**—कोण राजद्रोही अमात्य!

**चारुशील०**—युक्ती सांगितली पण आतां कृती करावी लाग-णार! मुत्सद्या डोक्यासह पलायन कररे बाबा! ( जातो )

**धनशील०**—हा अमात्य राजद्रोही नसून राजनिष्ठच आहे.

**कामाक्ष०**—असत्य राजनिष्ठेचं बक्षीस इथल्या इथंच दिलं पाहिजे.

**धनशील०**-कामाक्षा! तुझी छाती असेल तर या वृद्धाच्या अंगाला हात लाव म्हणजे काय प्रकार घडेल तो आपोआपच दिसेल!

**सौदामिनी०**-शाबास! अमात्य शाबास! वीर वृत्तीला साजेल असंच उत्तर दिलंत.

**कामाक्ष०**-( रागानें ) सौदामिनी सम्राज्ञी पदाला अनुचित असलेल्या प्रोत्साहनाचा परिणाम फार भयंकर होईल!

**सौदा०**-काय होईल!

**कामाक्ष०**-रक्तपात!

**धन०**-कुणाचा!

**कामाक्ष०**-तुझा आणि प्रसंग पडल्यास सौदामिनीचाही!

**रुद्रशील०**-( प्र. क. ) सौदामिनीच्या एका केसाला धक्का लागला तर-

**कामाक्ष०**-तर काय!

**धैर्यशील०**-( प्र. क. ) मी देतो याचें उत्तर! धनशील बोला-तुमच्या वचनाची आठवण देऊन मी तुम्हाला असं विचारतो कीं सम्राट म्हणविच्या कामाक्षाचं मस्तक या वेळीं माझ्या हातांत आहे. करू धडापासून वेगळं-सौदामिनी-बोल घेऊ याचा सूड-

**सौदा०**-तरवार म्यान करा महाराज. याचा निर्णय सम्राट-दीनाच्यावेळीं ही सौदामिनी करणार आहे.

**अंक दुसरा समाप्त.**

# अंक ३ रा.



## प्रवेश १ ला.

[ पात्रेंः—कटाक्ष, रुद्रमणी व भद्रशील. ]

स्थळः—रुद्रपूर–राजवाडा.

**रुद्रमणी**०–कटाक्ष तुम्ही सत्याचे पाठी राखे आहांत हें पाहून मला कीती तरी आनंद झाला ह्मणून सांगू?

**कटाक्ष**०–राणी सरकार गरीबांच्या नशिबीं विधात्यानं सेवेचा लेख लिहिला असला तरी त्यांनीं नोकरी राखण्याकारितां असत्या पुढं मान वाकविणं केव्हांही श्रेयस्कर नाहीं.

**रुद्रमणी**०–तुमचं म्हणणं यथार्थ आहे पण अशा प्रकारची विचार सरणी फार थोड्या नोकरांची असते.

**कटाक्ष**०–नोकरीच्या पाशांत मनुष्य अडकला ह्मणजे त्याला कोणत्याहि प्रकारचा सारा सार विचार रहात नाहीं. नोकरी राखण्या करतां आपल्या वरीष्ठाची-त्याला मर्जी संभाळावी लागते.

**रुद्रमणी**०–असं जरी असलं तरी तुमच्या सारखे नोकर आपली सत्यनिष्ठा गमावित नाहींत.

**कटाक्ष**०–सरकार गरिबाचा हा निष्कारण गौरव होतो आहे. इमानानं चाकरी करून पोटाची खळगी भरण्या पलीकडे गरीबाला कांहींच माहीत नाहीं.

**रुद्रमणी०**—इमानाची कदर बाळगणं हेंच तर सेवाधर्मातलं मुख्य कर्तव्य आहे. अन्यायाची जहागीरकरण्यापरीस न्यायाची गुलामगिरी श्रेष्ठ असते.

**कटाक्ष०**—राणीसरकार एवढा तारतम्य भाव नोकरांत जर असतां तर चक्रवर्तीच्या सिंहासनावर कामाक्षाचें पापी पाय लागून रत्नपूरचं पवीत्र सिंहासन विटाळलं नसतं!

**रुद्रमणी०**—हक्काचं सिंहासन बिगर हक्कदाराला मिळतं तें याचमुळं स्वार्थाच्या पाशवी भावनेला बळीं पडून सिंहासनाचे सेवक मालकाशी बेमानगिरी करून परक्याला मालक बनण्यास मदत करीत असतात.

**कटाक्ष०**—रत्नपूरच्या बाबतींत आपण म्हणतां तसा प्रकार झाला आहे खरा! रत्नपूरचं राजकारण आणखी कोणत्या थराला जाणार आहे याचा कांहीं एक कयासच करतां येत नाहीं.

**रुद्रमणी०**—कटाक्ष कोणत्याही गोष्टीला काळ यावाच लागतो. पापाचे घडे पूर्णपणें भरल्याशिवाय कुठलाही पापी नेस्तनाबूद होत नाहीं. चौदाचौकडीचा असूर सम्राट पापाचें घडे भरताच नाहींसा झाला. उन्मत कौरवांची तीच गत झाली. आणि खात्री असुद्या कीं, सम्राट कामाक्षाची तशीच गत होईल.

**कटाक्ष०**—त्या काळाची प्रतीक्षा करीत स्वस्थ बसावं असच ना आपलं म्हणणं!

**रुद्रमणी०**—काळाची प्रतीक्षा पाहण्या ऐवजी प्रयत्नाची पराकाष्ठा करणच अधीक श्रेयस्कर असतं. परिस्थितीपुढं मान वाकविण्यापेक्षां तिच्यावर मात करण्यातच खरी मर्दुमकी आहे.

भद्रशील०-( प्र. क. ) मासाहेब आपल्या आज्ञे प्रमाणं माझी सर्व तयारी झाली आहे.

रुद्रमणी०-युवराज तुम्ही माझी आज्ञा इतकीं पाळतां ही खरोखरच आनंदाची गोष्ट आहे?

भद्रशील०-मासाहेब मातेची आज्ञा ही परमेश्वराच्या आज्ञे परीस अधीक आहे.

कटाक्ष०-युवराजांच्या मातृनिष्ठेचं कौतुकच करावं?

भद्रशील०-कटाक्ष यांत कौतुक कसलं? प्रत्येकानं आपलं कर्तव्य बजावलंच पाहिजे!

रुद्रमणी०-युवराज आज मी तुह्माला तेच करायला सांगणार आहे.

भद्रशील०-बोला मासाहेब आपली आज्ञा शिरसामान्य करून कर्तव्य बजावतो.

रुद्रमणी०-युवराज या कटाक्षा बरोबर तुह्मी सम्राटाकडं जा.

भद्रशील०-कोणत्या सम्राटाकडं-कामाक्ष सम्राट-मासाहेब ज्या उन्मतानं बाबांना सिंहासनावरून काढलं, जो आमचं रुद्रपूर अन्यायानं खालसा करायला उद्युक्त झाला त्या सम्राटाकडं? बोला त्या उन्मत्ताकडं जाऊन काय करूं बोला मासाहेब?

कटाक्ष०-राणी सरकार त्या राक्षसाकडं कां चिमण्या राजांना पाठवता?

भद्रशील०-कटाक्ष यांत तुह्मांला आश्चर्य का वरं वाटलं सम्राट कामाक्ष म्हणजे कुणी अस्मान फाडून उतरलेला नाहीं त्याच्या पुढं जायला मला मुळींच दिक्कत वाटत नाहीं.

कटाक्ष०—युवराजचं वय—

भद्रशील०—वय लहान असलं म्हणून काय झालं! धडाडी व शौर्य हीं वयावर केव्हाही नसतात असतीं काहीं मासाहेब?

रुद्रमणी०—नसतात बरं युवराज—शौर्य व धडाडी ही वयावर अवलंबून नसतात ते गुण उपजतच अंगी असावे लागतात लहान सिंहाचा छावा मस्त हत्तीला जर्जर करतो ना!

भद्रशील०—परवा तुह्मी मला नाहीं कां दाखवलंत? आपल्या गजराजापुढं चिमुकल्या सिंहाला नेताच त्यानी कशीं झडप घातली ती! ते मी पाहीलं आहे. कटाक्ष तुम्ही जर तो खेळ पाहीला असतात तर तुम्हाला फारच मौज वाटली असती.

कटाक्ष०—ती मौज पाहून आनंद वाटण्यापेक्षां राणीसरकार आपल्याला कशा प्रकारचं शिक्षण देत असतात हें ऐकूनच अत्यंत आनंद वाटला आहे.

रुद्रमणी०—कटाक्ष क्षत्रियांना असंच शिक्षण दिलं पाहिजे. राष्ट्रसेवा करणाऱ्यांना निवृत्तीचं तत्वज्ञान काय बरं कामाचं! त्यांना प्रवृत्तीपर वीर वृत्तीचंच शिक्षण पाहिजे.

कटाक्ष०—राणी सरकाराचा बोल सार्थ आहे.

भद्रशील०—मासाहेब जाऊना यांच्या बरोबर सम्राटाकडं! त्याला जाऊन अस्सा सवाल करतो—

रुद्रमणी०—काय सवाल करणार त्याना?

भद्रशील०—बाबाना सिंहासनावरून काढण्याचा तुला काय अधिकार आहे. असा सवाल या तरवारीनं विचारणार आहे.

**कटाक्ष॰**—वीर वृत्ती प्रखर आहे.

**रुद्रमणी॰**—युवराज तो जवाब आपण विचारूं—पण—

**भद्रशील॰**—पण ह्मणून थांबता कां?

**रुद्रमणी॰**—तो जबाब मीच त्याला जातीनं विचारणार आहे. कटाक्ष युवराजांना घेऊन तुम्ही सम्राट धैर्यशील महाराजांकडे जा. याना त्यांच्या हवाली करा. मी एथली सर्व व्यवस्था करून त्यांच्या दर्शनाला येतेंच. युवराज जा यांच्या बरोबर. कटाक्ष—बाळराजाना नीट संभाळून न्या बर—आणि बारकाईनं सम्राट कामाक्षाच्या स्वारीची हकीकत काढून मला तावडतोब कळवा.

**कटाक्ष॰**—राणी सरकार आपण अगदीं निर्धास्थ रहा पोटच्या गोळ्या पेक्षां हा चिमण्या विराचं मी जतन करीन. कामाक्षाच्या स्वारीचा तलास काढून सुगावा लागतांच जातीनें येऊन कळवीन युवराज चला. ( दोघे नमस्कार करून जातात. )

**रुद्रमणी॰**—धैर्यशील महाराजाकडं युवराज खात्रीनं सुरक्षीत राहतील. रुद्रपूरवर आपलं शिक्का मोर्तब करण्याचा डांव फसला हें सम्राटाला समजलं तर तो जातीन रुद्रपूरवर स्वारी करील यांत शंका नाहीं. अद्याप त्याची तशा प्रकारची कांहीं एक हालचाल माझ्या कानीं आली नाहीं. कटाक्षानां सांगितल्या प्रमाणं तें गुप्त पणानं वित्तं बातमी काढून इकडे कळवतीलच. सेनापतींना हुशारीन वागायला सांगितलच आहे. युवराजांना पोचवून कटाक्ष परत येई पर्यंत मनांत योजलेलं कार्य उरकून घ्याव! राजाना अन्यायानं राजसंन्यास घ्यायला लवणाऱ्या जुलमी सम्राटाला या शस्त्रानं निर्वाणीचा सवाल विचारलाच पाहिजे! ( जातो. )

---

## अंक ३ रा.

### प्रवेश २ रा.

[ पात्रें—चारुकान्त, चारुशीला व चारुशील ]

**स्थळः**—बागेंतील—एकभाग

चारुकान्तः—देव दानवांच्या युद्धांत समुद्र मंथन होऊन अनेक रत्नांचा शोध लागला असं माझे श्रीपूज्य गुरुदेव सांगत होते. पण—राजरस्ते व गुप्त रस्ते यांचं मंथन करून मला ते रत्न कांहीं सापडलं नाहीं. ओसरी पासून स्वयंपाकघराचा प्रदेश पाया-खालीं घातला. देवळापासून गुरु चरणीचा भूगोल उल्लंघन केला पण—काय निराशे शिवाय कशाचीच प्राप्ती झाली नाहीं. आज मुत्सद्याची गृहलक्ष्मी कोणत्या घरांत पूजली गेली आहे कोणाला ठाऊक? लक्ष्मी प्रसन्न करून घेणतरे लक्ष्मी नंदन दरसाल लक्ष्मीचं सार्वजनीक पूजन करतात. पण—या मुत्सद्याची लक्ष्मी सांजसकाळ निरनिराळ्या ठिकाणीं पूजलीं जाते! आतां ही लक्ष्मी सापडणार कशी आणि कुठं—काल पुराणाला देखील आली नाहीं. देवाला साक्ष ठेवून अध्याय संपवावा लागला इतक्यांत जर कां यजमान आलें तर या शास्त्रयाची मोठीच पचाईत होईल. अतां याना शोधू तरी कुठ राधेकृष्ण? राधेकृष्ण ( बसतो ) दमलो बुवा—फिरून कामदेवा तुला देखील शास्त्राची नाहींना दया येत तो तरीं मला कसा पावणार, कामदेवाचा उत्सव केल्या शिवाय तो कधीं तरी कुणाला पावला आहे कां! आराधने शिवाय जर देव

प्रसन्न झाला तर तो देव कमला एखाद्या प्रेम गीतानं प्रेमळ गिता लाभेल पण-दगडाचा देव कांहीं चटकन लाभणार नाहीं? हो असंच करावं या रस्त्यावरच कामदेवाची आराधाना करून त्याला प्रसन्न करून घ्यावं हें कामदेवा?

—पद्य—

रतिनाथ तुझा प्रेमजनीं एक विसावा ॥
प्रियभाव रिझावा ॥ धृ० ॥ प्रार्थीत तुला जीव नवा ॥
लाज न कांही ॥ चाले रित लोकीं ॥ धृ० ॥
नरनारी मनीं पुजी तुला स्नेह जडावा ॥
जिव शांत करावा ॥ १ ॥
विश्रांत तुझी क्लांत ईशा प्रेमळ जीवा ॥
जिव्हारीं बसें पाश तुझा भारी ॥
रुप दावुनिया शुद्ध मनें शांत करिया ॥
प्रियभाव रिझावा ॥ २ ॥

चारुशीला०-( प्र. क. ) अगबाई हा कुणाचा अवतार?

चारुकान्त०—वत्सा हा कामदेव तुला प्रसन्न झाला आहे वाटेल तो वर मागून घे.

चारुशीला०—वाटेल तो वर मागून घे-म्हणजे हा वरदानाचा नवा अवतार जन्माला आला आहे कीं काय?

चारुकान्त०-हा माझा तेरावा अवतार आहे शिष्यांच्या उद्धारार्थ मी प्रत्यक्ष मृत्यू लोकीं अवतीर्ण झालों आहें!

चारुशीला०—तेरावा अवतार—ह्मणजे हा कोणी देव आहे कीं काय?

चारुकान्त०—आह्माला कोणी कुसुमायुध ह्मणतात, कोणी रतीनाथ म्हणतात, कोणी पुष्पधन्वा ह्मणतात, कोणी मदनप्रभू म्हणतात तर कोणी, कामदेव म्हणून आह्माला आळवतात?

चारुशीला०—मी कीतीग बाई भाग्याची आज मला प्रत्यक्ष कामदेवाचं दर्शन झालं माझा खरोखरींचं उद्धार झाला. रामचंद्राच्या पादस्पर्शांन जसा अहिल्येचा उद्धार झाला तसा यांच्या पादस्पर्शानं माझां उद्धार होईल. देवा? या दासीची सेवा गोड करून घ्या? इतक्यांत दिवसाची तपश्चर्या आज फळाला आली? किती-किती भाग्यवान मी, देवा गरीब दासीवर नाहीं ना—अवकृपा होणार? पुष्पांची पूजा नाहीं ना-कोमेजून जाणार? दासीनं हृदयांत पुजलेला परमेश्वर लाभेलना हिला? देवा सलगीच्या भांडणानं दीन दासीवर नाहीना रागवणार देवाधि देवा गरीबाची कण्हेरी ह्मणून शेवती ह्मणून मानून घ्याल ना? रतीपतीश्वरा दासीची भक्ती गोड करून घ्या नी हीला आपला वर द्या?

—पद्य—

मानुनी घ्यावी पुजा निर्धार हा पायीं सदा ॥
भाग्यभारी झालें दर्शन लाभली गुरुसंपदा ॥ धृ० ॥
येत उदया ही सुहास्या पुष्पधन्वा प्रेमदा ॥
वांछना नाही दुजी ती वरद द्यावा युष्मदा ॥ १ ॥

चारुकान्त०-पुष्पांच्या पूजे पेक्षां आम्हाला मानस पूजा-आवडतं सुभानानं आह्मी प्रसन्न होत नाहीं?

चारुशीला०-देवाना काय पाहिजे आहे?

चारुकान्त०-मन पाहिजे सुमन नको.

चारुशीला०-मन तर केव्हांच वाहिलं आहे. देवा आपल दर्शन झालं तेव्हांच ही दासी आपपर भाव विसरून गेली-

—पद्य—

देह माझा आज झाला पाहूनी पावन पदा ।।
भान गेलें ध्यान ठसलें वाहिलें जीवन पदा ।।धृ०।।
दासी विनवी कामदेवा लोभ ठेवावा सदा ।।
चारुकान्त०-हृदयीं ठेवीं या प्रभूला वाहुनी मन संपदा ।।१।।

चारुकान्त०-शाबास! तुझ्या सेवेवर आह्मी खूष आहोंत तुझ्या मनाप्रमाणं सर्व गोष्टी जुळून येतील!

चारुशीला०-माझं मन!

चारुकान्त०-ज्या शास्त्र्यावर बसलं आहे तो शास्त्री तुला अंतर देणार नाहीं. तुझ्या पतीवर लौकरच एक संकट येईल त्या संकटातून तो वाचणार नाहीं?

चारुशीला०-माझं आयुष्य कसं जाईल देवा!

चारुकान्त०-आयुष्यतलें दिवस दिवसाप्रमाणें व रात्रीं रात्रींप्रमाणं जातील.

चारुशीला०-ह्मणजे काय देवा?

चारुकान्त०—आतां जशी दिवसाची रात्र करावी लागते तशी या पुढं लागणार नाहीं. तुझ्या मागच्या जन्मीं तूं एका—महाशास्त्र्याची पत्नी होतीस तोच शास्त्री या जन्मी तुझ्या नशिबीं आहे.

चारुशीला०—देवा आपले उपकार जन्मोजन्मी फिटणार नाहींत बरं आतां परवानगी असावी?

चारुकान्त०—समाधी उतरल्या शिवाय परवानगी नाहीं?

चारुशील०-(प्र. क) परमेश्वरानं खैर केली आणि डोक्यावरच संकट तूर्त तरी पार पडलं. ऐन वेळीं पळण्याचा प्रताप गाजवला ह्मणून बरं नाहीं तर सम्राटांनीं ह्या अवतार संपवून मुत्सद्याची समाधीच बांधली असतीं—छे? छें? नुसतं डोकं कांहीं उपयोगाच नाहीं. त्याला शौर्याची जोड पाहिजे तिच्या माझ्यांत आहे अभाव पण डोक्याचा कांहीं कमी नाहीं प्रभाव हें. कोण—इथ अरे ही तर चारु—चारु ही कोणत्या नव्या देवाची आराधाना?

चारुशीला०—देवाची पूजा देखील करूं देत नाहीं ना? एकांतात बसून देवाला आळवीन ह्मटलं तर तिथं देखील तुमचा त्रास?

चारुशील०—हा कोणता देव आहे?

चारुशीला०—हा कामदेवाचा अवतार-छे प्रत्यक्ष कामदेवच हे?

चारुशील०—कामदेव? आणि याची आराधाना तूं करतेस.

चारुशीला०—मग काय तुम्हाला करायला सांगू.?

चारुकान्त०—राधेकृष्ण? राधेकृष्ण? राधेकृष्ण?

चारुशीला०—अगबाई?

चारुशील०—कशी आहे कामदेवाची चतुराई? अहो कामदेव कसं काय?

चारुकान्त०—आतां मी कामदेव नाहीं—शास्त्री आहे राधेकृष्ण.

चारुशील०—अशी ढोंग सोंग करून हिला नादी लावतोस काय?

चारुकान्त०—कामदेव माझ्या अंगांत येतात यांत सोंग नाहीं व ढोंगहीं नाहीं जेव्हां प्रसंग पडतो तेव्हां मी कामदेवाची अराधना करतो राधेकृष्ण.

चारुशीला०—पण ही गोष्ट मला कशी कळवली नाहींत—

चारुकान्त०—सर्वच गोष्टी कशा कळवाव्यात राधेकृष्ण!

चारुशील०—ह्मणजे काय?

चारुकान्त०—यजमान आतां डोक्यासह पळून आले ही गोष्ट कुठं बरं त्यानी आपल्याला कळवली आहे. राधेकृष्ण—

चारुशील०—यानी तर माझेच दांत माझ्या घशांत घातलें जाऊदे—एखाद्याच्या अंगांत येतो असा देव. हा श्रद्धेचा प्रश्न आहे. पण—चारु या देवापासून जरा दूरच रहा हो—नाहींतर देव स्वरुपांत शेवटच्या भक्तीचं दर्शन घडेल या मुत्सद्याला!

चारुशीला०—कसं वागावं हे चांगलं समजत आहे मला!

चारुकान्त०—भक्तीमुळं यांना तारतम्य भावाचा चांगलाच परिचय—झाला आहे. राधेकृष्ण!

चारुशील०—ह्मणूनच सूचना करावी लागते राधेकृष्ण चारु जरा इकडे ये एक कान गोष्ट सांगायची आहे.

चारुशीला० चला पाहूं (चारुशीला चारुकान्ताला खुण-वून जाते)

चारुकान्त०-सहजा सहजी जमून जातं तें हें असं या नव्या कल्पनेवर कांहीं दिवस तरी जिवाची गमंत करतां येईल अवताराची गुरुकिल्ली म्हणजे या जगांतली एक अजबवल्ली आहे राधेकृष्ण! गुरु होऊन उद्धार करायला असलें शिष्य फार उत्तम. अवताराचं महात्म्य कांहीं कमीं नाहीं राधेकृष्ण-

—पद्य—

गुरुबाजी सफलही कशी झाली ॥
गुरुशाहीची किमया हातीं आली ॥ धृ० ॥
अजब रित खुळीं सुखी मी जळीं स्थळीं ॥
प्रभू नवा दिसत चनीं प्रितवेली ॥ १ ॥

---

## अंक ३ रा.

### प्रवेश ३ रा.

[ पात्रें-कामाक्ष, रुद्रमणी व सौदामिनी ]

स्थळ:-उद्यान

रुद्रमणी०-आज मी राजा म्हणजे प्रती परमेश्वर या भावनेला पायाखालीं तुडवून एका राजाचा खून करायला उद्युक्त झाले आहे. हा सम्राटाचा खून करून मी राज्य हत्तेच पातक माझ्या शिरावर घेत आहे. राजहत्तेच पातक म्हणजे सर्व पातका

पेक्षां अत्यंत महापातक होय पण हें पातक कसं? पापी माणसाला या जगांतून नाहींसं करणं याला पातक कसं ह्मणावं पापाचे भीरु पाश पापाची क्षूद्र कल्पनाच जगांतल्या पापाची वाढ करीत असते. राजाला परमेश्वर माना अशी आमच्या धर्मांची आज्ञा मूळांत किती जरी शुद्ध हेतून नमूद केली असलीं तरी या राजा सारख्या परमेश्वराला ती लागू करायला माझच्च काय पण कुणाही सज्जनांच मन कबूल होणार नाहीं. सर्व साक्षी परमेश्वरा या हत्तेच्या पातका बद्दल मी तुझी क्षमा मागते?

**कामाक्ष**०–( झोपेंत ) सौदामिनी?

**रुद्रमणी**०–सौदामिनी?

**कामाक्ष**०–( झोपेंत ) सौदामिनी सम्राज्ञी झालीच पाहिजे.

**रुद्रमणी**०–शिव शिव–राजाच्या मनांत अहर्नीश प्रजेच्या कल्याणाची काळजी असायला पाहिजे पण या राजा रुपधारी सैतानाच्या मनांत काय ही भलतीच कल्पना! राजरक्षणाच्या ऐवजी याच्या मनांत सत्तेच्या जोरावर अपहरण करून आणलेल्या सौदामिनीला सम्राज्ञी करण्याचा दुष्ट विचार–थांब–अधमा असला विचार करणार–तुझं मन या शस्त्रानं नाहींस करून टाकते आणि स्वारीला अन्यायान सिंहासनावर काढल्याचा जाब या शस्त्राकडून विचारतें [ रुद्रमणी कामाक्षाना ठार मारायला जाते तोच सौदामिनी तिचा हात धरते ] मला विरोध करणारी कोण व्यक्ति आहे?

**सौदामिनी**०–मी सौदामिनी!

**रुद्रमणी**०–सौदामिनी तू मला या कार्यापासून निवृत्त करावस ना. असल्या राक्षसाला तुझा पाठिंबा असावा–

**सौदामिनी०**—रुद्रमणी एखाद्याचा असा अपघातीं खून करणं हें वीर स्त्रीला शोभत नाहीं. सम्राटाचा सूड अशा रितीनं घेणं मला नामंजूर आहे.

**रुद्रमणी०**—सोड मला—हें शस्त्र त्याचं जुलमी अंतःकरण विदीर्ण करण्याकरितां पहा कसं अधीर झालं आहे.

**सौदामिनी०**—रुद्रमणी मी येथं असतानां तुला सम्राटाचा अशा रितीनं सूड घेऊं देणार नाहीं!

**रुद्रमणी०**—मग काय याच्या जुलमांत आम्ही अस्सचं मरयाचं जीणं घालवावं?

**सौदामिनी०**—याची जुलमी कारकीर्द लौकर संपुष्टांत येईल!

**रुद्रमणी०**—लौकर म्हणजे?

**सौदामिनी०**—सम्राटदिनापर्यंत वाट पहा—

**रुद्रमणी०**—सौदामिनी, या दुखवलेल्या हृदयाला आतां उसंत नाहीं याक्षणीं याच घडीला सम्राट या रुद्रमणीच्या शस्त्राला बळी पडलाच पाहिजे!

**कामाक्ष०**—कोण! सौदामिनी आणि ही कोण?

**रुद्रमणी०**—तुम्ही ज्याना सिंहासनावरून अन्यायानं काढलं त्यांची मी धर्मपत्नी!

**कामाक्ष०**—रुद्रशीलाची राणी?

**रुद्रमणी०**—हो त्यांची राणी आणि तुमची वैरीण!

**कामाक्ष०**—आमची वैरीण-सम्राटाशीं वैर करणं म्हणजे मृत्यूशी झुंजणं होय.

रुद्रमणी०—मृत्यूशी झुंजणं म्हणजे वीरांगनेला एक मामुली खेळणं वाटतं—मृत्यूची भिती बाळगली असतीं तर रुद्रपूराहून तुमच्या अन्यायाचा जाब विचारण्याकरतां या शस्त्रासह येथें आलेंच नसतें या सौदामिनीनं ऐनवेळीं—येऊन माझं शस्त्र काढूनं घेतल नसतं तर राजा कामाक्षा या घडीला असा दिसलाच नसतां.

कामाक्ष०—याचा अर्थ काय? तूं आमचा खून करणार होतीस कीं काय?

रुद्रमणी०—हो! त्याच उद्देशानं मी इथं आले होतें—पण माझा उद्देश हीन—या—सौदामिनीनं सफल होऊं दिला नाहीं.?

कामाक्ष०—सौदामिनीनं तुला निवृत्त केलें शाबास सौदामिनीचं आमच्यावर तस प्रेम आहेच?

सौदामिनी०—कामाक्ष—आपण आपल्या मनाची कशीही कल्पना करा आपण आपल्या मनाचें मुखत्यार आहांत. रुद्रमणीला मी आपल्या खूना पासून—प्रवृत्त केलें तें माझं आपल्यावर प्रेम आहे म्हणून नव्हे?

कामाक्ष०—मग कां म्हणून?

सौदामिनी०—आपला सूड उगविण्याचा हिचा हा रक्तपाताचा मार्ग मला पसंत नाहीं म्हणून?

कामाक्ष०—अस्सं एकूण हिच्या प्रमाणं तुझ्या ही मनांत आमच्या विषयीं सूडाची भावना आहे म्हणायची—

सौदामिनी०—तिचा उच्चार न करणं हेचं श्रेयस्कर आहे—

कामाक्ष०—यांत मला कांहीं तरी फंद फितूर दिसतो आहे—

**रुद्रमणी**०–फंद फिसाद कसला फंद फिसाद असतां तर आह्मी सूडाची कल्पना नाकबूल केली असती. शत्रूला शत्रू ह्मणण्यांत जो निर्भिडपणा आहे तो शत्रूला मित्र ह्मणून त्याचा सूड उगविण्यांत नाहीं ?

**सौदामिनी**०–रुद्रमणीच ह्मणणं सार्थ आहे. कोणत्यही शत्रूला तं आमचा शत्रू आहेस असं स्पस्ट सांगाव मित्र ह्मणून त्याच्याशी वागून त्याचा शत्रू ह्मणून सूड उगवण हें क्षत्रियाना मुळीच शोभत नाहीं ?

**कामाक्ष**०–सौदामिनी तुझं पांडीत्य आम्हाला नको. आमच्या मनाची तूं कशी जरी समजूत घातलीस तरी–तिचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं तूं ज्या अर्थी येथें आलीस त्या अर्थी या रुद्रमणी प्रमाणं आमचा खून करण्याचा तुझा बेत असलाच्च पाहिजे ?

**सौदामिनी**०–कामाक्ष, मनुष्याचं मन जसं चिंतन करीत असतं तसंच त्याला जग भासत असतं.

**रुद्रमणी**०–कामाक्ष, सौदामिनीचि या बाबतींत मुळींच अंग नाहीं. मीच हा बेत केला !

**कामाक्ष**०–आमची खात्री पटत नाहीं.

**सौदा**०–नसेल पटत

**कामाक्ष**०–सौदामिनी, बंदीची जागा सोडून येथें येण्यांत या व्यक्तीरीक्त तुझा दुसरा कोणता उद्देश होता ?

**सौदा**०–सम्राटदिन जवळ आला आहे तेव्हां त्या बाबतींत माझे विचार स्पष्ट मांडावे ह्मणून तुमच्या मुलाखतीला आले होतें !

कामाक्ष०—कसलं विचार

सौदा०—रत्नपूरच्या गादीबद्दल.

कामाक्ष०—त्याचा विचार करण्याचं कारण काय?

सौदा०—त्या गादीचें खरे हक्कदार धैर्यशील महाराज आहेत.

कामाक्ष०—बिलकुल नाहीं त्या गादीचें आम्हीच मालक आहोंत.

रुद्रमणी०—दुसऱ्याची दौलत अन्यायानं पचवून मालक बनलेल्याला खरा मालक म्हणत नाहींत.

कामाक्ष०—त्याची वाटाघाट बायकांनीं करूं नये.

सौदा०—ती कां?

कामाक्ष०—राजकारण हा बायकांचा विषय नाहीं.

रुद्रमणी०—राजकारण हा स्त्री पुरुषांचा विषय आहे. रत्न-पूरच्या कारकीर्दींत पुरुषाप्रमाणं स्त्रीयांनीं ही राजकारण यशस्वी पणें केलेलं आहे.

सौदा०—इतकंच नव्हेतर रत्नपूरच्या हक्काच्या लढ्यांतही अजून आम्हां बायकांचं राजकारण आहे.

कामाक्ष०—रत्नपूरचा लढा सम्राटदिनाच्या दिवशीं कायमचा मिटविण्याचा आमचा बेत आहे. बंडखोर आणि धनाशिलादि त्याचे सांथीदार राजद्रोहाच्या आरोपावरून पकडून त्यांचा काय-मचा निकाल आम्ही लावणार आहोंत.

रुद्रमणी०—सम्राटदिनाच्या दिवशीं?

कामाक्ष०—हो त्याच दिवशीं त्याच महोत्सवांत—

**रुद्रमणी**०-कामाक्ष-त्या महोत्सवांत सिंहासनाधीश्वर धैर्य-शील यांचा-

**सौदा**०-रुद्रमणी स्वस्थ रहा.

**कामाक्ष**०-यांत कांहीं तरी दगलबाजी दिसते आहे. कोण आहेरे तिकडे-या दोघींना तळघरांत डांबून ठेवा आणि सक्त पहारा ठेवा. ( दोघींना पकडतात. )

**रुद्रमणी**०-कामाक्ष आमच्या सारखा प्रसंग तुमच्यावर लौकरच येईल.

**कामाक्ष**०-या गोष्टीचा तपास केलाच पाहिजे. कांहीं तरी गुप्त बेत चाललें असावें. रुद्राक्ष!

**रुद्राक्ष**०-( प्र. क. ) सम्राटांचा जयजयकार असो.

**कामाक्ष**०-रुद्रापुरावर शिक्का मोर्तब झालं कीं नाहीं?

**रुद्राक्ष**०-सरकार-धैर्यशीलानी ऐनवेळीं घात केला रुद्रपूरला त्याच्या सैन्याची मदत आली.

**कामाक्ष**०-नामर्द! तिकडे गारद झाला असतास तर फार बरं झालं असतं-

**रुद्राक्ष**०-सरकार कसूर माफ करा.

**कामाक्ष**०-तुमचा निवाडा लौकरच करूं. आत्ताच्या आता चहुकडे हेर पाठवा आणि बंडखोराचा तपास करा त्यांची आमच्या विरुद्ध कांहीं तरी कारस्थान चालली असावीत. जा! ( जातो ) आम्ही त्याच्या राणीची आणि सौदामिनीची व्यवस्था करतो. सम्राट दिनाच्या दिवशीं अजात शत्रु म्हणून आम्ही आमचं नांव जाहीर करणार आहोंत.

---

## अंक ३ रा.

### प्रवेश ४ था.

स्थळः—चारुशिलेचें घर.

पात्रें:—चारुशिला, चारुकान्त व चारुशील

चारुशीला०—त्या दिवशीं मला खरखुरंच देवाचं दर्शन घडलं बाई, तिकडच्या रुपानंच माझ्या नेत्राचं समाधान झाले. कामदेवाचा उत्सव साजरा करावा असं फार दिवसापासून माझ्या मनांत होतं पण ती कामगिरी शास्त्र्यानीच—इश्श मेलं आतां त्याना कधीं कधीं शास्त्री म्हणणार नाहीं मी त्याना माझ्या हृदयाचा परमेश्वर म्हणेन. भक्तान धांवा केला कीं परमेश्वर त्याला पावतो. पण माझा परमेश्वर कसाग बाई चुकला, खरं म्हटलं तर माझ्या हांकेला तो धांवत यायचा. देवा असा कांबरं अबोला धरला तुमच्या खांद्यावरची शालजोडी एखाद्या गोधडीशीं गुजगोष्टी नाहींना सांगत बसली! तुमच्या गळयांतल्या रुद्रमाळाची वैजयंती कोण्या लक्ष्मीच्या कंठांत कशी दिसते ह्मणून न्याहाळीत नाहींना बसलांत! तुमचे दोन्ही कर कटीवरून काढून कोणा सवतीनं आपल्या करपाशांत नाहींना अडकविलें! देवा दासीच्या दर्शनाला असा कां बरं विलंब लागला. माझ्या सावळ्या सांबावर कुण्या गोऱ्या पार्वतीची नजर खिळून नाहींना राहिली दासीच्या देह धारी धेवा बोलाना परत—प्रेम लहरी प्रीतीच्या महासागरांत उसळू लागल्या आहेत. माझ्या मनमोहना—



चारुकान्त०—

—पद्य—

तनु फुलवित खुलवित बोलतही ॥
नव सागर सुंदरी डोलतही ॥ धृ० ॥
सखी शांत मनें दिल दावितही ॥
नव नार जशी अध वारीतही ॥
शरिता सौख्य सुजानिथा बाई खेळतही ॥
सखी हांसत खेळत चालतही ॥ १ ॥

चारुकान्त०-(प्र.क.) आज आराधाना कोणत्या देवाची चालली आहे राधेकृष्ण.

चारुशीला०-दुसरा कोणत्या देवाची आराधना करायची बाई?

चारुकान्त०-ज्या देवाची आराधना पहिल्या पासून सुरूं आहे त्याशिवाय दुसऱ्याची आराधना करूं नये राधेकृष्ण.

चारुशीला०-मला आपला पहिल्या पासून एकच देव माहित आहे.

चारुकान्त०-हा एकेश्वरी पंथ मला देखील पसंत आहे. सांज सकाळ एकाच देवाचं ध्यान करावं असं शास्त्र सांगत आहे राधेकृष्ण?

चारुशीला०-आपल्या शिकवणीप्रमाणेंच वर्तन करतें आहे मी.

चारुकान्त०-राधेकृष्ण! राधेकृष्ण! फार समाधान होत आहे हें ऐकून.

चारुशीला०-खरंच कां बाई!

चारुकान्त०-आज काल असा आशांकितपणा राहिला आहे कोठें? बरं तं असुद्या चला तयारी करा आज समाप्तीचा दिवस आहे. राधाकृष्ण आख्यानाची आज समाप्ती करावयाची आहे.

चारुशीला०-आजच कां? पण इतक्यांत नको गडे.

चारुकान्त०-आख्यानाची समाप्ती ही झालीच पाहिजे. आज भगवती राधा भगवान् श्रीकृष्णाच्या स्वरुपांत विलीन होणार आहे. राधेकृष्ण!

चारुशीला०-अगदीं कसं अचूकच आलं हें पर्व?

चारुकान्त०-पर्वकाळ असा अचूकच येतो.

चारुशीला०-भगवती राधा कितीबाई भाग्याची.

चारुकान्त०-आत्मभोगाशिवाय भाग्य नाहीं. आणि भक्ती शिवाय स्वरुप मिलन नाहीं असा शास्त्रीय सिद्धांत आहे राधेकृष्ण

चारुशीला०-पण मला माझा देव अजून कसा प्रसन्न होत. नाहीं.

चारुकान्त०-भक्ताची कसोटी पाहिल्याशिवाय देव प्रसन्न होत नाहीं राधेकृष्ण?

चारुशीला०-आतां माझी कसोटी ती काय पहावयाची आहे देवा.

चारुकान्त०-अब्रह्मण्यंम्! अब्रह्मण्यंम् मी देव नाहीं राधेकृष्ण!

चारुशीला०-देवाला आपण देव आहोंत असं कधीं तरी वाटतं कां? भक्तच त्याला देव म्हणतात ना!

चारुकान्त०-या दोन हाताच्या देवाला देवलोकांत देखील जागा. मिळायची नाहींना?

**चारुशीला०**—देव लोकांत नाहीं मिळाली तर—

**चारुकान्त०**—स्मशानांत मात्र खात्रीन मिळेल राधेकृष्ण!

**चारुशीला०**—असं काय बोलायचं तें वेड कां लागलं आहे?

**चारुकान्त०**—मला का आपल्याला राधेकृष्ण!

**चारुशीला०**—देवा?

**चारुकान्त०**—आज कोणता शकून झाला होता कुणाला ठाऊक! आज आपण हें काय चालवलं आहेत.

**चारुशीला०**—देवभक्तांच सलगीचं भांडण आहे हें!

**चारुकान्त०**—या सलगीच्या भांडणांत मुत्सद्याकडून माझ्या सगळ्या हाडांचा चुरा होईल राधेकृष्ण!

**चारुशीला०**—त्यांची ती कसली भीती!

**चारुकान्त०**—भीमरुपी महारुद्रा वज्र हनुमान मारुती. राखी अन्न या गड्याची वांछीतो हा संप्रती.

**चारुशीला०**—असं काय करायचं तें!

**चारुकान्त०**—भीती नाशक नवं स्तोत्र ह्मणतो आहे राधेकृष्ण!

**चारुशीला०**—एकदां सांगितलना कीं भीती नाहीं म्हणून माझ्या देवाची आराधाना करायला त्यांचीच काय पण कोणाचीही भीती नाहीं. मी माझ्या देवाला पूजीन, रंजवीन, खेळवीन काय वाटेल ते करीन.

**चारुकान्त०**—(स्वगत) देवाच्या कसोटीला भक्त उरला म्हणायचा राधेकृष्ण!

**चारुशीला०**—हृदयस्थ जनार्दना!

**चारुकान्त**०-( स्वगत ) आणखी एक वळसा देऊन पहावं ( उघड ) हा वेडा विचार सोडून द्या राधेकृष्ण!

**चारुशीला**०-मी देखील हीच विनंती करतें आहे चरणाजवळ

**चारुकान्त**०-(स्वगत) चरणाजवळ कां माझ्याजवळ (उघड) ती काय राधेकृष्ण?

**चारुशीला**०-

—पद्य—

**विनवित पदास दासी राया ॥**
**सुखवा विलास राया राया ॥**
**हेतु मनीचा पुरा करावा जिवा शिव**
**मिळवावा राया ॥**
**बोले फुकाचा अधि त्यजावा ॥**
**दिला दील रिझवावा राया ॥ १ ॥**
**चारुकान्त०-गुरु शिष्येचा योग मजेचा खुला बोल**
**नच जाई वाया ॥ २ ॥**

**चारुशील**०-( प्र. क. ) अरेरे! शेवटीं या वृद्धपणीं हेंच कां पहायचं होतं! मुत्सद्या कसा आहे हा वृद्ध तरुणीचा संसार

**चारुशीला**०-आतां खरी आख्यानाची समाप्ती झाली.

**चारुकान्त**०-राधेकृष्ण!

**चारुशील**०-हे पहाण्यापेक्षां मुत्सद्याची समाप्ती झाली तर फार बरं झालं असतं.

**चारुकान्त०**—आतां पुढं कसं काय करायचं!

**चारुशील०**—पुराणाची ही चालती बोलती दक्षणा घेऊन समाधान मानायचं. चारु फार चांगलं केलंस बरं! पुराण श्रवणाचा चांगलाच उपयोग केलास हा!

**चारुशीला०**—यांत मी वाईट तें काय केलं?

**चारुशील०**—आतां वाईट ते आणखी काय करायचं राहिलं आहे.

**चारुकान्त०**—राधेकृष्ण! राधेकृष्ण!

**चारुशील०**—परमेश्वरा हा संसाराचा धुंठवडा पाहण्यापेक्षां मला एखाद्या अंधार कोठडींत आजन्म सक्त मजूरी करण्याची घोर शिक्षा देरे बाबा!

**शिपाई०**-( प्र. क. ) चला सम्राटाच्या आज्ञेवरून तुम्हाला तीच शिक्षा देण्यांत आली आहे.

**चारुशील०**- छान! हिला हा पुराणिक पावला आणि मला सम्राट भोवला. अरे पण मी असं केलं तरी काय बाबा?

**शिपाई०**- सौदामिनीला तुरुंगांतून सोडून दिल्याबद्दल तुम्हाला ही शिक्षा देण्यांत आली आहे चला लौकर.

**चारुशील०**—आलोच बाबा! चारु येतो मी—पण हो आतां मी तर जाणारच पण शेवटीं एकच विनंति करतो कीं या शास्त्र्याला तरी अंतर देऊ नको. मुत्सद्या अखेर डोक्यानीच हा प्रसंग आणला ना! ( त्याला घेऊन जातात )

**चारुकान्त०**—राधेकृष्ण! राधेकृष्ण! राधेकृष्ण! मी सांगितलं होतनां कीं, चारुशीलावर संकट येईल ह्मणून पहा लगेच प्रत्यंतर. देवाची वाणी असत्य होणारच नाहीं राधेकृष्ण!

चारुशीला०-ही एकच कां? आणखी देखील खरी ठरली आहे.

चारुकान्त०-ती कोणती राधेकृष्ण?

चारुशीला०-मनांत योजलेल्या देवाची प्राप्ती झाली ही.

चारुकान्त०-राधेकृष्ण-आतां झालंना मनासारखं.

चारुशीला०-झालं ह्मणून काय विचारायचं तें.

—पद्य—

चारुशीला०-दु:ख हें निवाले झाली सौख्य आले ॥
आश्रुही पळाले हास्य हें उदलें ॥
भक्तिचें मिळाले फळही माते
विलोले ॥ ध्रु० ॥ झाली

चारुकान्त०-हा योग असा अतिच सुलभ या जनीं खरा ॥
बुल बुल मिलन अधी राहो सार्थ नरवरा ॥

चारुशीला०-दासी सुखाचि प्रित बोले गुलाळीं ॥
करि धरोनि ही दिलदार विशाली ॥
लाभला जिवाचा ठेवा धन्य नेत्र झालें ॥ १ ॥

---

## अंक ३ रा.

### प्रवेश ५ वा.

स्थळः—कामाक्षाचा दरबार

पात्रेंः—कामाक्ष, रुद्राक्ष व कांहीं सरदार.

रुद्राक्ष०—चक्रवर्तीचा जयजयकार असो.

कामाक्ष०—रुद्राक्ष आज हा प्रकार काय घडला. आजचा सम्राट दिनाचा दरबार आणि राजे रजवाडे, दरबारी मानकरी अद्याप कसे हजर झालं नाहींत! आजपर्यंत न घडलेली गोष्ट कशी घडून आली. सर्वत्राना सम्राट दिनाच्या दरबाराचा संदेश धाडण्यांत कांहीं कसूर अथवा गफलत तर झाली नाहीं ना?

रुद्राक्ष०—सेवकाकडून कोणत्याही तऱ्हेची गफलत वा कसूर झालेली नाहीं दरबारला हजर राहण्याविषयीं प्रत्येक राजाला, मानकऱ्याला, सरदार दरकदारांना मी जातीनं निमंत्रणें केली होती.

कामाक्ष०—असं असतांना हा प्रकार कसा घडला! त्यानी सम्राटाच्या आज्ञेचा भंग केला! आजपर्यंत आमच्या हुकूमाची अशी अवज्ञा घडली नव्हती!

रुद्राक्ष०—सरकार प्रमाणं मलाही आश्चर्यच वाटतं आहे या प्रकाराबद्दल!

कामाक्ष०—आश्चर्य? बिलकूल नाहीं. मला गोष्टींची स्वप्नं पडत होती त्याचें आज प्रत्यंतर आलें.

रुद्राक्ष०—म्हणजे काय सरकार?

**कामाक्ष०**-बंडखोराला सर्व लोक मिळाले असून त्यानं आमच्या विरुद्ध बंड पुकारलेलं आहे. आमची आज्ञा भंग करून सर्व राजे आणि दरबार मानकरी त्या दरोडेखोराच्या निशाणाखालीं एकत्र झालेलें आहेत. असं स्वप्न आम्हाला पडले होते.

**रुद्राक्ष०**-सरकारनी असल्या स्वप्नावर विश्वास ठेवूंच नये.

**कामाक्ष०**-आमचा त्यावर बिलकूल विश्वास नाहीं. रुद्राक्ष आह्मी मनांत योजल्या प्रमाण आजचा सम्राट दिन साजरा झालाच पाहिजे. सम्राटदिन साजरा केल्यानंतर ज्या ज्या उन्मत्तांनी आमच्या आज्ञेचा भग केला आहे त्यांचा ईन्साफ करूं.

**रुद्राक्ष०**-सरकारांनीं अगोदर उन्मत्तांची व्यवस्था करावी आणि त्यांच्यावर विजय मिळवून मग सम्राटदिनाचा समारंभ साजरा करावा.

**कामाक्ष०**-तसं करतां येणार नाहीं. सम्राट दिन आजच साजरा झाला पाहिजे. हा दिन लांबणीवर टाकला तर सौदामिनीला सम्राज्ञी पदावर बसविण्याला कालावधी लागेल.

**रुद्राक्ष०**-सौदामिनीला सम्राज्ञी ह्मणून या घटकेला देखील सरकारांना सिंहासनावर बसविता येईल. सम्राटांना ही गोष्ट कांहीं अशक्य नाहीं.

**कामाक्ष०**-हो असं करतां येईल. जा! सौदामिनीला आणि रुद्रमणिला दरबारांत घेऊन या. ( रुद्राक्ष जातो. ) सौदामिनीला सम्राज्ञी केल्यावरच उन्मत्त माथे फिरूंचा निकाल करूं. ( सौदामिनीं व रुद्रमणी येतात ) सौदामिनी ठरल्याप्रमाणं आज आह्मी सम्राटदिन साजरा करीत आहोंत. आणि या दिनाची स्मृती



सम्राट कामाक्ष०—

ह्मणून या आमच्या सिंहासनावर आमच्या समवेत सम्राज्ञी ह्मणून बसण्याची आज्ञा करीत आहोंत.

**सौदामिनी०**—ही सम्राटदीनाची नवीनच पद्धत वाटतें आहे मला!

**कामाक्ष०**—नवीन कसली ? सम्राटदीनाचा असाच प्रकार असतो.

**सौदामिनी०**—सम्राट आणि त्याचा एखादा बगलबच्चा आणि थोडेसे सेवक मिळून सम्राटदीन साजरा होत नसतो. सम्राटदीन हा उत्साहानें जनतेनी साजरा करावयाचा असतो. पण आजचा हा ओसाड दरबार पाहिला म्हणजे याला सम्राटदीन ह्मणावं कीं अन्य नांव द्यावं हेंच मला समजत नाहीं. या औदास्यावरून तुह्मी खरो-खरच कांहीं तरी बोध घ्यायला पाहिजे

**कामाक्ष०**—मला तुझ्या उपदेशाची अवश्यकता नाहीं. सम्राटदीनाच्या दिवशीं तुला सम्राज्ञी करण्याची आमची प्रतिज्ञा पुरी झालीच पाहिजे.

**सौदामिनी०**—हा सम्राटदीनच होत नाहीं तेथे प्रतिज्ञा तरी कशी पुरी करावी.

**कामाक्ष०**—याचा अर्थ काय!

**सौदामिनी०**—सम्राटदीन ह्मणजे सम्राटाचा वार्षिक दरबार होय. सर्व राजे मांडलीक व छत्राखालचे नागरीक यांच्या संमतीने व मदतीनें होणारा आनंदाचा राजकीय वाढदिवस! आज येथे दुसऱ्या कोणीही नाहीं तेव्हां हा खरा सम्राटदीनच होत नाहीं.

**रुद्रमणी०**—याचं सम्राटपद या दरबारच्या कुत्र्या शिवाय कोणालाही मान्य नाहीं हें या वरूनच दिसून येत आहे.

कामाक्ष०—माथेफिरू स्त्रीये? आजच्या मंगल प्रसंगी उगीच अमंगल प्रकार नको असं जरी आह्मी ठरविलेलं असलं, तरी भलताच बोल आह्मी सहन करून घेणार नाहीं.

रुद्रमणी०—खरी स्थिती बोलायला मला कोणाचीही भिती नाहीं.

कामाक्ष०—या प्रसंगी स्त्री हत्येचं पातक न घडेल तर फार बरं!

रुद्रमणी०—तुझ्या सारख्याचा दरबार उघड्या डोळ्यांनीं पहाण्यापेक्षां मरण फार बरं!

रुद्राक्ष०—सरकार या उन्मत स्त्रीचा शिरच्छेद करूं कां!

सौदामिनी०—रुद्राक्ष एवढ्याच करतां कां शस्त्र बाळगतां! रुद्रमणीच्या केसाला जर धक्का लागेल तर या दरबारांत तुमच्या रक्ताची सरीता वाहविल्याशिवाय ही सौदामिनी स्वस्थ बसणार नाहीं.

कामाक्ष०—रुद्राक्ष थांबा—याचा निर्णय मागावून करूं! सौदामिनी चल आटप आमच्या सिंहासनावर आरूढ हो आणि आमची सम्राज्ञी झाल्याचें आम्हाला जाहीर करूं दे.

सौदामिनी०—हें तुमचं सिंहासन!

कामाक्ष०—हो आमचं—सम्रायचं सिंहासन आहे.

सौदामिनी०—नाहीं—कामाक्ष हें तुमचं सिंहासन नाहीं. हे धैर्यशील महाराजाचं खऱ्या सम्राटाचं सिंहासन आहे. मनगटाच्या मर्दुमकी-वर सिंहासन स्थापन करा. आणि मग आपलं सिंहासन ह्मणून मला सम्राज्ञी या नात्यानें त्यावर आरुढ होण्याची आशा करा.

**रुद्रमणी**०—सौदामिनी चांगलं—चांगलं उत्तर दिलंस.

**रुद्राक्ष**०—हें सम्राट कामाक्षाचंच सिंहासन आहे.

**सौदामिनी**०—तुम्ही एकटेच असं ह्मणतां पण सर्व राजे व जनता याला मुळींच कबुली देत नाहीं.

**रुद्राक्ष**०—ह्मणजे काय?

**सौदामिनी**०—कामाक्षाचं जर हें हक्काचं व खरोखरीचं सिंहासन असतं तर सर्व राजे व जनता यांनीं आजचा सम्राट दीन आनंदानं साजरा करून, सम्राटाचा जयजयकार केला असतां.

**कामाक्ष**०—आम्ही आमचा जयजयकार करायला त्यांना भाग पाडू. आह्मांला जें सम्राट ह्मणत नाहींत अगर ह्मणणार नाहींत, त्यांची एकजात कत्तल करून टाकूं.

**रुद्रमणी**०—या एकाच दटावणींत तुमच्या विषयींचं जनतेचं व राज मंडळाचं कीती प्रतिकूल मत आहे हें स्पष्टपणें दिसून येत आहे.

**कामाक्ष**०—त्याची आह्मांला पर्वा नाहीं. आह्मी ज्या अर्थी या सिंहासनावर अधिष्ठीत झालों आहोत त्या अर्थी हें आमचच सिंहासन आहे.

**रुद्रमणी**०—सिंहासनाला लोकांची मान्यता असावी लागतं.

**कामाक्ष**०—सौदामिनी, चल आमच्या बरोबर सिंहासनावर बैस. चल ये लौकर.

**धनशील**०—(प्र. क.) सौदामिनी सिंहासनावर बसेल तेव्हां बसेल पण कामाक्ष तू मात्र त्या सिंहासनावरून खालीं उतर.

**रुद्रशील**०—(प्र. क.) चल उतर खालीं नाहीं तर जबरदस्तीनं खेचून काढावं लागेल.

कामाक्ष०—रुद्राक्ष, फौजेची तयारी करा या राजद्रोही उन्मत्तानां चांगलीच शिक्षा केली पाहिजे.

धनशील०—कामाक्ष, आतां तुझी आज्ञा कोणीही मान्य करणार नाहीं. त्याना जर तुझ्या आज्ञेची दिक्कत वाटली असती तर आजचा तुझा सम्राट दिन असा उदासवाणा केव्हांच झाला नसतां.

कामाक्ष०—हें सारं त्या बंडखोराचं कारस्थान दिसतं आहे

धैर्यशील०—(प्र. क.) कामाक्ष-हें माझंच कारस्थान आहे.

कामाक्ष०—कट करतां काय? थांबा एकेकाची चांगलीच मस्ती जिरवतो.

भद्रशील०—(प्र. क.) कामाक्ष, चल मी तयार आहे उपस तरवार आणि होऊंदे दोन हात.

धनशील०—कामाक्ष—चल उतर खालीं. रुद्रशील ज्यानी तुह्माला अन्यायानीं राज्यभ्रष्ट केलं त्याला सिंहासनावरून खेचून काढा.

रुद्रशील०—कामाक्ष-मुकाट्यानं खालीं उतर नाहींतर तुला जबरदस्तीनं खेचून काढावं लागेल.

कामाक्ष०—मी या सिंहानावरून केव्हांही उतरणार नाहीं.

धनशील०—कामाक्ष-हें सिंहासन धैर्यशील महाराजांचे आहे. हेंच या सिंहासनाचे खरें सम्राट आहेत मुकाट्यान हें सिंहासन त्यांच्या हवालीकर नाहींतर भलताच प्रसंग ओढवेल.

लोक०—मुकाट्यानं खाली उतरा नाहींतर आमची शस्त्रें चालवावी लागतील.

**कामाक्ष०**—फितुरी-फितुरी आहे सारी ( खालीं उतरतो )

**रुद्रशील०**—कामाक्ष—उजाडलाना दिवस—ज्या दिवशीं मला अन्यायानं माझ्या हक्काच्या सिंहासनावरून खेचून काढलस त्या दिवशीं मी तुझ्यवरही असा प्रसंग येईल असा इशारा मी दिला होताना ?

**धनशील०**—खऱ्या हक्कदाराला त्याचं सिंहासन मिळवून देणं ही फितुरी नाहीं तें सत्त्य निष्ठांचें कर्तव्य आहे. धैर्यशील महाराज बसा या सिंहासनावर.

**धैर्यशील०**—अमात्त्य हें जरी माझ्या हक्काचं सिंहासन असलं तरी तुमच्या एकट्याच्या अनुज्ञेनं मला सिंहासनावर बसतां येत नाहीं.

**लोक०**—धैर्यशील महाराजांच्या राज्या रोहणाला आम्हा सर्वांची संमती आहे.

**धैर्यशील०**—अमात्त्य व माझे मित्रहो मी आपल्या अनुज्ञेनं या सिंहासनावर आरुढ होतो-पण अमात्त्य—

**धनशील०**—सम्राट—मी समजलों मी जरी सौदामिनीच्या विवाहाबाबत प्रतिज्ञा केली होती तरी तुमच्याच कृतीने ती प्रतीज्ञा पुरी झालेली आहे.

**सौदामिनी०**—पण हा सम्राटाचा सूड होत नाहीं.

**धनशील०**—अन्यायी सम्राटला सिंहासनावरून खेचणं व त्याच्या ऐवजी खऱ्या सम्राटला सिंहासनावर बसविणं हाच खरा तोतया सम्राटाचा सूड होय. धनशील—सरदारहो बसा आपआपल्या

स्थानावर धैर्यशील महाराज कामाक्षाला कांहीं वर्षासन करून देऊन याची व्यवस्था केली पाहिजे.

**धैर्यशील०**–अमात्य आपण सांगाल त्या प्रमाणं व्यवस्था करूं रुद्रशील आपलं राज्य पुन्हा आपणांस देण्यांत आलं आहे. कटाक्ष या कामाक्षाला आणि त्याच्या या साक्षीदाराला अंधार कोठडींत ठेवा.

(जातात.)

**धनशील०**—सौदामिनी इकडे ये धैर्यशील महाराज या माझ्या सौदामिनीचा स्विकार करा.

**रुद्रमणी०**–' सम्राटाचा सूड ' चांगलाच उगवला बाई !

**भद्रशील०**–महाराज हा खरा सम्राटदीन झाला म्हणायचा.

**सर्व०**–सम्राट धैर्यशील महाराजांचा जयजयकार असो.

